






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र



संपादक

वा. रा. ढवळे

वर्ष ३२ : अंक १२४ जानेवारी–फेब्रुवारी–मार्च १९५८

या अंकांत

डॉ. गं. ब. ग्रामोपाध्ये, प्रा. सुरेश म. डोळके, वि. स. खांडेकर, डॉ. र. वि. हेरवाडकर, डॉ. के. ना. वाटवे, य. दि. पेंढरकर, ना. कृ. गोडबोले, मधुकर केचे, वि. म. कुलकर्णी शिवाय संपादकीय, इतिवृत्त, पत्रव्यवहार इत्यादि.



# साभार-स्वीकार

१ मीना (काव्य)- मीना दीक्षित; सौ. शशिकला दीक्षित, रविवार पेठ, सातारा.

२ जिज्ञासोद्यान (ज्ञानेश्वरीविषयक सात लेख) – द. वें. केतकर, गुंडबावडीसमोर, विजापूर.

३ माझीं चाळीस भावंडं (कथा) – भाऊ मांडवकर, सेवा प्रकाशन, झेंडा चौक, महाल, नागपूर २.

४ मानस-गीत-पुष्प – टकूबाई जोशी, गो. ह. दंडवत, तडवळें (बार्शी); ७५ नये पैसे.

५ जाई-जुई (काव्य)- खं. म. लकडे, ज. शं. रत्नपारखी, वसुंधरा हुद्दलगोळ; ज. शं. रत्नपारखी, मंगळवेढें (सोलापूर).

६ मध्यरात्रींचें सूर्यदर्शन (माझा फिन्लंडचा प्रवास)—लालजी पेंडसे; १९६ चर्नीरोड, गिरगांव, मुंबई ४; २ रु.

७ भरती (कथा)–ज्ञानेश्वर नाडकर्णी; मनीषा प्रकाशन, अमरभुवन, मुंबई ७; ३॥ रु.

८ चांदण्यांतील गप्पा (कथा) — ब. कं. शेलार; ज. स. निकम, उरूलता-पाटण (उ. सातारा); १ रु.

९ रेशमाचा कोश (नाटक)- वसंत नागपुरे; अजय प्रकाशन, नाशिक; रु.२-५०.

१० पं. नेहरू यांच्या कार्याची अस्मिता–श. वि. लिमये; धों. स. परांजपे, नागपूर; २७ न. पै.

११ सिंधी-भाषाका संक्षिप्त परिचय– कृष्णचंद्र जैतली; मुरलीधर कृष्णचंद्र जैतली, पदमजी कंपाउंड, भवानी पेठ, पुणें २; ४ रु.

१२ काव्यकुंज (कवितांचें त्रैमासिक, वर्ष १, अंक १)–संपा.–प्रका.–रामचंद्र लिंबाजी भैंदरकर, उस्मानाबाद; वा. वर्गणी ४ रु.

१३ साहित्य–१९५६ (मुंबई मराठी साहित्य संघाचें वार्षिक) प्रकाशक : दि. वि. आमोणकर, संयुक्त कार्यवाह, मुं. म. सा. संघ, मुंबई ४, मूल्य २ रु.

१४ शिळान–(कथासंग्रह)– ले. उद्धव ज. शेळके, शाम प्रकाशन, तपोवन, अमरावती. किं. १-७५ रु.

### कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रस्ता, पुणें २, प्रकाशनें—

१५ (१) मेघदूत–रा. प. सबनीस; १॥ रु.

१६ (२) शंख आणि शिंपले–(कथा) ना. ग. गोरे; ३ रु.

१७ (३) रातराणी (लघुनिबंध)–वि. पां. दांडेकर; ३ रु.

१८ (४) मेघमाला (काव्य)– म. रं. शिरवाडकर; २ रु.

१९ (५) लक्ष्मण-रेषा (कथा)–लक्ष्मणराव सरदेसाई; ३ रु.

### मौज प्रकाशन, खटाववाडी-मुंबई ४; प्रकाशनें:—

२० (१) मृगजळ (कविता)–इंदिरा संत; रु. २-५०

२१ (२) बापाची पेंड (कथा)–द. मा. मिरासदार; रु. ३-७५

[ कव्हर पान ३ पहा.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे



वर्ष ३२, अंक १२४ जानेवारी–फेब्रुवारी–मार्च १९५८

## या अंकांत



संपादकीय
पत्रव्यवहाराचा पत्ता :
१२६ डी. फणसवाडी, मुंबई २.

महाराष्ट्र साहित्य परिषद्,
टिळक रस्ता, सदाशिव पेठ, पुणें २.

# नवीन सभासद

## तहहयात

१. प्रा. वा. ल. कुलकर्णी, मुंबई.
२. श्री. र. गो. सरदेसाई, मुंबई.

## साधारण

१. श्री. वसंत शिरोळकर, पुणें २.
२. श्री. शं. अ. कुलकर्णी, पुणें २.
३. श्री. व. के. शेलार, उरूल (उ.सातारा).
४. श्री. द. मा. जातेगांवकर, पुणें ४.
५. श्री. मा. ग. दळवी, पुणें ५.
६. श्री. वि. त्रिं. भट, सातारा.
७. श्री. शं. कृ. वेलणकर, सातारा.
८. श्री. ना. ग. धडफळे, पुणें २.
९. श्री. ध. रा. देशमाने, पुणें २.
१०. श्री. अ. गो. गोखले, पनवेल.
११. सौ. सिंधुताई गोखले, खालापूर(कुलाबा).
१२. श्री. प. रा. दाते, पेण ( कुलाबा ).
१३. श्री. ग. बा. नवांगुळ, पनवेल.
१४. श्री म. शं. पतकी, पनवेल.
१५. श्री. वि. शं. पटवर्धन, पनवेल.
१६. श्री. प्र. रा. पाध्ये, पनवेल.
१७. श्री. पुं. ग. पुराणिक, पनवेल.
१८. श्री. म. वि. पुराणिक, पनवेल.
१९. श्री. गो. स. फडके, पनवेल.
२०. सौ. तारामती राजाराम भावे, पनवेल.
२१. श्री. गोदावरी केशव रहाळकर, अलिबाग.
२२. श्री. ना. र. रिसबूड, तळाशेत (कुलाबा).
२३. श्री. ग. ल. रेगे, पनवेल.
२४. सौ. उषा रामचंद्र वाझे, पनवेल.
२५. श्री. व. शि. वैद्य, पनवेल.
२६. सौ. विजया गोखले, पनवेल.
२७. श्री. सू. रा. कुलकर्णी, पुणें २.
२८. श्री. त्रि. वि. बोकील, पुणें २.
२९. श्री. शं. रा. खरात, पुणें २.
३०. श्री. पु. ग. मराठे, नागपूर १.
३१. श्री. ना. वि. जोशी, पुणें २.
३२. श्री. दत्तप्रसन्न काटदरे, मुंबई.
३३. श्री. शं. रा. सारडा, पुणें २.
३४. श्री. मु. वि. सोवनी, पुणें २.
३५. श्री. द. गो. गोरे, पुणें ४.
३६. प्रा. प्रमोदिनीदेवी, पोरबंदर.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३२, अंक १२४ जानेवारी—फेब्रुवारी—मार्च १९५८

## संपादकीय

### रंगभूमीची करमणूक-करांतून सुटका

सर्व नाट्य—प्रयोग व सर्कशींचे प्रयोग यांना करमणूक-करांतून यापुढे सूट देण्याची घोषणा मुंबई सरकारने नुकतीच केल्यामुळे, रंगभूमीच्या उत्कर्षाची चिन्ता वाहणाऱ्या सर्व नाट्यप्रेमी जनतेला व कलावंतांना अत्यानन्द व्हावा हें साहजिकच होय. हा कर रद्द केला जावा म्हणून गेलीं कित्येक वर्षे महाराष्ट्रांत चळवळ सुरू होती. नाट्य—परिषदा, साहित्य-संमेलनें, नाट्योत्सव, नटांचा अगर नाटककारांचा सत्कार इत्यादि समारंभांच्या प्रसंगीं या कराविरुद्ध आवाज उठविला गेला नाहीं अगर ठराव केले गेले नाहीत असें कधी झालें नाही. सरकारकडे विनंत्या, अर्ज, साध्या मागण्या, तीव्र नापसंती, निषेध इत्यादि साधनांनी जनतेचा या कराविरुद्ध असलेला असंतोष पोंचला नाहीं असेंहि नाही. मुंबई सरकारचे मुख्य मंत्री व संबंधित खात्याचे मंत्री यांना अनेक शिष्ट—मंडळांनी समक्ष भेटून या करमणूक-करामुळे रंगभूमीच्या विकासांत कसे अडथळे निर्माण होत आहेत, यासंबंधीचीं निवेदनेंहि सरकारकडे सादर केलेलीं होतीं. अशा प्रकारच्या प्रयत्नांत मुंबई मराठी साहित्य संघाने हिरीरीने नि सातत्याने भाग घेऊन त्या वेळच्या मुख्य मंत्र्यांच्या कानांवर करमणूक- कराविरुद्ध असलेला जनतेचा असंतोष प्रभावीपणाने घातलेला होता. या सर्व प्रयत्नांचा जरी तात्काळ परिणाम झाला नाही तरी कर रद्द करण्यासंबंधीची एक अनुकूल भूमि मात्र तयार होत होती. हा कर या वर्षापासून रद्द करण्याचीं तात्कालिक कारणें राजकीय, सांस्कृतिक अगर दुसरीं कांहीहि असोत, माझ्या माहितीप्रमाणे मुंबई सरकारचे मुख्य मंत्री श्री. यशवन्तराव चव्हाण यांनी जर या प्रकरणीं नेटाचा आग्रह धरला नसता तर हा कर यावर्षीहि रद्द झाला असता किंवा नाही याबद्दल शंकाच आहे. अर्थात्, ज्यांनी ज्यांनी हा कर रद्द व्हावा म्हणून चळवळ केली अगर प्रयत्न केले त्यांचें तर अभिनन्दन केलेंच पाहिजे; पण हा करमणूक-कर रद्द करण्याची समयज्ञता प्रकट केली याबद्दल सरकारलाहि खास धन्यवाद देणें आवश्यक आहे.

हा करमणूक-कर आता उठल्यामुळे, नाट्यसंस्था व नाट्यक्षेत्रांत कार्य करणारे कलावंत यांच्यावर रंगभूमीचा विकास अगर उत्कर्ष साधण्याची मोठीच जबाबदारी येऊन पडली आहे यांत शंका नाही. कारण रंगभूमीच्या विकासाच्या आड येणाऱ्या कारणांचा ज्या ज्या वेळीं विचार होई, त्या त्या वेळीं करमणूक-कराची एक प्रमुख अडचण सांगण्यांत येत असे. करमणूक-कर रद्द झाल्यामुळे, ही अडचण आता यापुढे सांगतां येण्यासारखी नाही. अर्थात्,

रंगभूमीच्या विकासाच्या आड येणाऱ्या इतरहि कांहीं अडचणी आहेत; पण त्यांचें स्वरूप एवढें तीव्र नाही. त्या सर्व अडचणींची तपशीलवार नोंद मुंबई मराठी साहित्य संघाने मुख्य मंत्र्यांना जें विस्तृत निवेदन आपल्या शिष्ट-मंडळाच्या वतीने सादर केलें होतें त्या निवेदनांत पूर्वीच केलेली आहे. त्या अडचणी दूर करून घेण्याच्या मार्गास आता लागलें पाहिजे. रंगभूमीच्या पुनरुत्थानाला मुंबई मराठी साहित्य संघाने अगदी योग्य वेळीं जोराची नि अत्यन्त महत्त्वाची चालना दिलेली असल्यामुळे, रंगभूमीच्या विकासाच्या आड येणाऱ्या इतरहि अनेक अडचणी दूर करून घेण्यासाठी साहित्य संघ यापुढेहि पुढाकार घेऊन जरूर ते प्रयत्न करील याबद्दल विश्वास वाटतो.

## डॉ. वा. दा. गोखले

मराठी भाषेंत संशोधनपर प्रबन्ध लिहून मुंबई, पुणें व नागपूर विद्यापीठांकडून डॉक्टरेट ही पदवी मिळविणारे विद्वान् अलीकडे बऱ्याच प्रमाणांत आढळून येऊं लागले आहेत. मराठी भाषा व वाङ्मय यांच्या सखोल व तपशीलवार अभ्यासाच्या दृष्टीने ही वस्तुस्थिति स्वागतार्हच म्हटली पाहिजे. त्या दृष्टीने अशा सर्वच प्रबन्धांच्या विषयांची नोंद 'पत्रिकें'तून व इतरहि वाङ्मयीन विषयांना वाहिलेल्या नियतकालिकांतून प्रतिवर्षी केली गेल्यास मराठी भाषेंत होणाऱ्या संशोधनपूर्ण अभ्यासाच्या स्वरूपाची कल्पना येण्यास निःसंशय मदतच होईल. कारण असले सर्वच प्रबन्ध प्रसिद्ध होतात असें नाही; किंबहुना सर्वच प्रबन्ध प्रसिद्धियोग्य असतील अगर नसतीलहि; आणि ते पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाले तरी त्यांच्या प्रसिद्धीला बराच विलंबहि लागण्याची शक्यता असते. अर्थात्, अशा प्रबन्धांच्या विषयांची निदान नोंद तरी होणें आवश्यक आहे.

हे विचार सुचण्याचें कारण माझे मित्र व 'महाराष्ट्र साहित्य परिषदे'चे सतत गेलीं पंधरा वर्षे चिटणीस असलेले प्रा. वा. दा. गोखले यांनी मराठी भाषेंत संस्कृत भाषेंतले कित्येक शब्द कसे रूढ झाले आहेत याचें डॉ. ए. द. कुलकर्णी यांच्या मार्गदर्शनाखाली संशोधन करून पुणें विद्यापीठाची डॉक्टरेटची पदवी नुकतीच मिळविली आहे हें होय. विशेषत: वयाच्या जवळजवळ साठाव्या वर्षी अशा प्रकारची अभ्यासप्रवृत्ति व चिकाटी दाखवून त्यांनी आपलें संशोधन पूर्ण करून डॉक्टरेटची पदवी मिळविली हें त्यांना जितकें भूषणावह तितकेंच त्यांचें हें यश म. सा. परिषदेलाहि अभिमानास्पदच म्हटलें पाहिजे. श्री. वासुदेवराव गोखले यांचा माझा गेल्या वीस-पंचवीस वर्षांचा निकटचा परिचय असल्यामुळे, ज्ञानाची आराधना व तपस्या करण्यासाठी या मुदतींत त्यांनी केलेल्या प्रयत्नांची व परिश्रमांची कल्पना मला आहे. विशेषत: कौटुंबिक आपत्तींचे अनेक अपघात व आघात सहन करूनहि त्यांनी ज्ञानोपासनेची ज्योत अखंड तेवत ठेवली आहे याची पुष्कळांना कल्पनाहि नसेल. कौटुंबिक आपत्तींच्या सतत आघातांनी व कौटुंबिक सुखाच्या अभावानेहि मनुष्याचा स्वभाव थोडा तऱ्हेवाईक बनत असतो. तसे कांही दोष त्यांच्या स्वभावांत मुळीच निर्माण झाले नसतील असें मला म्हणावयाचें नाही. पण तसल्या कांही दोषांकडे थोड्या सहानुभूतीनेच आपण पाहिलें पाहिजे. गोखले अगदी सुरवातीला मुंबई येथील भरडा हायस्कूलमध्ये संस्कृतचे शिक्षक होते. एक उत्कृष्ट शिक्षक म्हणून त्यांची त्याच वेळीं विद्यार्थी व शिक्षकवर्गांत ख्याति होती. त्यानंतर ते मुंबईच्या नाथीबाई ठाकरसी कॉलेजमध्ये संस्कृतचे प्राध्यापक झाले इ. स. १९३९ सालीं आचार्य अत्रे यांच्या स्फूर्तीने व प्रयत्नांमुळे पुणें येथे गांधी ट्रेनिंग कॉलेज सुरू करण्याचें ठरलें, त्या वेळीं गोखले यांची निवड त्या कॉलेजचे प्रिन्सिपल म्हणून केली गेली. त्या वेळेपासून ते पुणें येथेच स्थाईक झाले. मुंबईला असतांना मराठी ग्रंथसंग्रहालयाशीं व मुंबई मराठी साहित्य संघाशीं त्यांचा निकटचा संबंध होता

व त्या संबंधांतून निर्माण झालेल्या साहित्यविषयक कार्याच्या आवडीमुळेच साहित्य परिषदेच्या चिटणीसपदीं त्यांची निवड करण्यांत आली होती अर्थात्, गांधी ट्रेनिंग कॉलेज ही संस्था फार काळ टिकूं न शकल्यामुळे एरंडवणें येथील महिला विद्यापीठाच्या एस्.एन्. डी टाकरसी कॉलेजांत संस्कृतचे प्राध्यापक म्हणून त्यांची फेरनिवड व्हावी हें साहजिकच होतें या संस्थेमधूनहि त्यांना वयाच्या मर्यादेला अनुसरून पुढेमागे निवृत्त व्हावेंच लागेल.

पदव्या मिळविण्याच्या हव्यासानेच गोखले यांनी ज्ञानोपासना केली असें म्हणतां येणार नाही. कारण त्यांना आता कुठे नोकरी मिळविण्यासाठी अर्ज करावयाचा आहे असें थोडेंच आहे ? ज्ञानाची उपासना करणें हें त्यांना एक व्यसनच जडलेलें आहे. अन्य व्यसन त्यांना नाही. त्यांच्या एकाकी जीवनाला व स्वभावालाहि हें व्यसन रमानवणारें व दिलासा देणारें असेंच आहे. आपलें पुढील निवृत्त आयुष्य त्यांनी अशाच प्रकारच्या ज्ञानोपासनेंत घालवावें व मराठी भाषेची बहुमोल सेवा करावी ही त्यांची इच्छा आहे. या संकल्पांत मी त्यांना अन्तःकरणपूर्वक सुयश चिंतितों.

**कै० नारायण केशव बेहेरे**

नागपूरचे सुप्रसिद्ध कवि व ग्रंथकार प्रा. ना. के. ऊर्फ नानासाहेब बेहेरे ता. १९ जानेवारी रोजीं हृदयक्रिया बंद पडून अगदी अनपेक्षितपणाने दिवंगत झाले ! मृत्युसमयीं त्यांचें वय ६८ वर्षांचें होतें. श्री. बेहेरे हे ' मनोरंजना 'च्या काळांत लेखक व कवि म्हणून पुढे आले सुरवातीचे कित्येक वर्षांचे ' मनोरंजन 'चे अंक चाळले तर जवळजवळ प्रत्येक अंकांत बेहेरे यांचा लेख अगर कविता आढळून आल्याशिवाय राहणार नाही. त्यांच्या लेखनाचें स्वरूप एवढें व्यापक असें की, शास्त्रीय विषयावरील लेखापासून तो अगदी तात्कालिक महत्त्वाच्या प्रासंगिक विषयापर्यंत त्यांची लेखणी स्वैरसंचार करीत असलेली आढळते. पदवीधरांचा कोणताहि रटाळ अगर नीरस लेख असला तरी त्या काळीं मासिकांतून त्याला हमखास प्रसिद्धि मिळत असे. मात्र पदवी नसलेल्या लेखकाच्या मौलिक लेखनालाहि प्रसिद्धीच्या बाबतींत अडचण येई. श्री. बेहेरे हे एम्. ए, बी. एस्सी., एल्. टी. या विद्यापीठाच्या पदव्या संपादन केलेले प्राध्यापक असल्यामुळे, त्यांच्या गद्य अगर काव्यलेखनाला प्रसिद्धीची अडचण कधीच पडली नाही. कोणत्याहि विषयावर त्यांनी लिहिलेले लेख जसे मासिकांतून तत्परतेने प्रसिद्ध होत असत, त्याचप्रमाणे त्यांनी लिहिलेलीं ' १८५७ ', ' हिंदु कोण ? ', ' सीता वनवास ', 'अहिल्योद्धार', 'ध्येयाकडे' हे ग्रंथ व 'मोत्यांची माळ' हा काव्यग्रंथ हीं पुस्तकेंहि प्रकाशित होण्यास त्यांना अडचण पडली नाही. 'बोथट बाण' हा त्यांच्या विनोदी नि खोचक लेखांचा संग्रहहि प्रसिद्ध झालेला आहे. यामुळे लेखक म्हणून त्यांचें नांव हां हां म्हणतां पुढे आलें.

श्री. बेहेरे हे बहुप्रसू लेखक होते. विपुल लेखन केल्यामुळेहि कदाचित् त्यांचें लेखन सखोल झालें नसावें. त्यांच्या लेखणींत व वाणींतहि दुर्दम्य उत्साह व जोष आढळून येई. इतका की पुष्कळ वेळां संयम व औचित्य यांचें भान त्यांना राहत नसे. इ. स १९३० सालीं कॉंग्रेसच्या चळवळींत ' मार्शल लॉ ' प्रकरणांत फाशीची शिक्षा झालेल्यांना उद्देशून ' सप्तर्षि ' या नांवाची त्यांची कविता 'चित्रमयजगत्' या मासिकांत प्रसिद्ध झाली होती. त्यामुळेच त्यांना आपल्या नोकरीस मुकावें लागलें !

श्री. बेहेरे हे बुद्धिमान्, शिक्षणतज्ज्ञ, इतिहासज्ञ, राष्ट्रीय वृत्ति नसानसांतून बाणलेले, धडाडीचे लेखक होते याबद्दल कोणाचेंहि दुमत होईल असें वाटत नाही. बाणेदारपणांत तर त्यांची प्रसिद्धीच होती. त्यांच्या निधनाने जुन्या पिढींतील एक राष्ट्रीयवादी, दमदार, निर्भय-वृत्तीचा, बाणेदार असा थोर साहित्यिक नाहीसा झाला आहे.

## साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष : कवि अनिल

येत्या मेच्या ता. ४, ५, ६ या तारखांना मालवण येथे मराठी साहित्य-संमेलनाचें ४० वें अधिवेशन भरण्याचें निश्चित झालें असून, त्या संमेलनाच्या अध्यक्षपदीं कवि अनिल ऊर्फ आत्माराम रावजी देशपांडे यांची निवड झाली आहे. हा बहुमान मिळाल्याबद्दल मी अनिलांचें अन्तःकरणपूर्वक अभिनन्दन करतों.

रविकिरणमंडळाच्या स्थापनेच्या कालापासूनच म्हणजे जवळजवळ इ. स. १९२२-२३ च्या सुमारास अनिलांनी काव्य-लेखनास सुरवात केली. टोपण नांवाने कविता प्रसिद्ध करण्याची त्या काळीं सरसहा प्रथा असल्यामुळे, आत्माराम रावजींनी 'अनिल' हें नांव धारण केलें. त्यांची सुरवातीची कविता गेय स्वरूपांतच अगर भावगीतांच्या स्वरूपांतच प्रसिद्ध झालेली आहे. अशा तीस-बत्तीस कवितांचा संग्रह 'फुलवात' या नांवाने इ. स. १९३३ सालीं प्रसिद्ध झाला. या संग्रहामुळे त्यांच्या कवितांकडे काव्य-रसिकांचें लक्ष विशेष वेधलें गेलें. या संग्रहांतील कवितांकडे पाहतां 'अनिल' हे सौन्दर्यवादी कवींच्या परंपरेंतीलच एक कवि असल्याचें स्पष्ट होतें. फार तर त्यांना गूढरम्यवादी असें म्हणतां येईल. प्रेमभावनेचें रूप-काच्या भाषेने केलेलें आविष्करण हें त्यांच्या बहुतेक कवितांचें स्वरूप त्या वेळीं होतें. गूढ सौन्दर्याचें विलक्षण आकर्षण अनिलांना असावें. याच वैयक्तिक गूढ भावनेचा आविष्कार त्यांच्या त्या वेळच्या कवितांतून आढळून येतो. मात्र त्यांच्या कवितांना एक प्रकारची बौद्धिक झाक असलेली दिसते. ती असूनहि कवितांत कोठेंच दुर्बोधता नाही, हें विशेष म्हटलें पाहिजे.

प्रेमभावनेच्या बारीक छटा भावगीतांतून समर्पक रीतीने व्यक्त करतां येत नाहीत म्हणूनच जाणीवपूर्वक त्यांनी पुढे मुक्तच्छन्दाचा आश्रय घेतला. त्याचें प्रवर्तन इ. स. १९३५ सालीं प्रसिद्ध झालेल्या 'प्रेम आणि जीवन' या त्यांच्या कथा-काव्यांत दिसून येतें. आधुनिक कवितेच्या क्षेत्रांत मुक्तच्छन्दाला प्रथम कोणीं सुरवात केली हा वादाचा मुद्दा क्षणभर बाजूला ठेवला, तरी मुक्तच्छन्दाचा मुक्तहस्त व ओजस्वी वापर अनिलांनीच प्रथम केला. हें यश त्यांना द्यावेंच लागेल इ. स. १९४० सालीं प्रसिद्ध झालेली त्यांची 'भग्नमूर्ति' ही दीर्घ कविता व १९४३ सालीं प्रसिद्ध झालेलें 'निर्वासित चिनी मुलास' हें काव्य हीं मुक्तच्छन्दांतच लिहिलेलीं आहेत. चर्चा व काव्यलेखन या मार्गांनी मराठी काव्यांत मुक्तच्छन्दाच्या प्रसाराला अनिलांनी मोठाच हातभार लावला आहे. इ. स. १९४० नंतर लिहिलेल्या निवडक स्फुट कवितांचा संग्रह १९४७ सालीं 'पेर्तेव्हा' या नांवाने प्रसिद्ध झाला.

अगदी सुरवातीला त्यांचें कविमन वैयक्तिक प्रेमभावनेच्या विषयांत रंगलेलें आढळलें तरी कालान्तराने तें व्यापक, सामाजिक व सांस्कृतिक पुनरुत्थानाकडे वेधलें गेलें. आपल्या जुन्या उज्ज्वल संस्कृतीचे स्मारक असलेले अवशेष भग्न होत असल्याची त्यांना उत्कट जाणीव होऊन, नवीन कर्तृत्वाला स्फूर्ति देण्याचें त्याचें महत्त्व पटल्याच्या खुणा त्यांच्या १९४० नंतरच्या कवितांत आढळतात. कवीची भूमिका सुटून प्रचारकाची भूमिका त्यांच्या काव्यांत जी डोकावते याचें कारण ही जाणीवच होय. अर्थात् गेल्या २५-३० वर्षांतील त्यांच्या काव्य-निर्मितीने मराठी काव्य-वाङ्मयांत त्यांनी आपलें वैशिष्ट्यपूर्ण स्वतंत्र असें स्थान निर्माण केलें आहे यांत शंका नाही. अनिलांना मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष या वर्षी करून त्यांच्या काव्यसेवेचें चीजच एका दृष्टीने मराठी वाचकांनी केलें आहे. मुंबई व उपनगर साहित्य संमेलन व विदर्भ साहित्य संमेलन यांनी अध्यक्षपदाचा हा मान त्यांना यापूर्वीच दिलेला असल्यामुळे मराठी साहित्य संमेलनाचें अध्यक्षपद अनिलांच्याकडे क्रमानेच आलेलें आहे. ● ● ●

वा. रा. ढवळे

गं. ब. ग्रामोपाध्ये

# लेखनाबाबत कांहीं तात्त्विक विचार

मनुष्य आधी बोलावयाला शिकला आणि नंतर लिहावयाला शिकला; म्हणजे आधी भाषण, आणि मग त्याचें लेखन. आपल्या बोलण्यांत जे जे ध्वनि येतात ते ते ध्वनि लिपि-चिन्हांकित करण्याचा प्रयत्न म्हणजेच त्याचें लेखन. प्रत्येक ध्वनीला स्वतंत्र चिन्ह देतां येणें ही आदर्श व्यवस्था होय. परंतु अनेक भाषांत ती दिसत नाही; मराठींतहि नाही. तालव्य आणि दन्त्यतालव्य असे दोन्ही उच्चार आपण करतों; परंतु ते एकाच चिन्हाने–वर्णाने–आपण दाखवितों. कांही विशिष्ट उद्गारहि यथाउच्चार लिहितां येत नाहीत. चालू मराठी लिपीची ही मर्यादा होय. ही मर्यादा दूर करतां येणार नाही का ? येईल; परंतु ती व्यवस्था टिकून राहीलच, असें नाही. भाषेच्या जीवमानांत वेळोवेळीं परभाषांचे जे संबंध येतात, त्या संबंधांमुळे पुन: कांही नवीन उच्चार भाषेंत शिरणें अशक्य नाही. उच्चारांत, म्हणजे पर्यायाने भाषेंत सतत फरक होत जाणार, आणि लिपीला तिच्याशीं मिळतें घ्यावें लागणार. परंतु तिने कितीहि मिळतें घेण्याचा प्रयत्न केला तरी गतिरूप भाषा आणि तिच्या तुलनेने स्थितिरूप लेखन यांच्यांतील अभेद टिकून राहणें एकंदरींत कठीणच.

भाषा आणि लेखन यांच्यांतील अंतराचें आणखीहि एक कारण आहे. भाषेच्या गतिशीलतेचेंच तें एक लक्षण आहे. भाषण हें एकापरी स्वैर असतें, चंचल असतें; लेखन त्या मानाने स्थिर असतें. भाषेची प्रवृत्ति बदलण्याकडे, विकास पावण्याकडे असते, तर लेखनाची प्रवृत्ति स्थितिरूप होण्याकडे, ‘ अक्षर ’ बनण्याकडे असते. शिवाय भाषा ही केवळ कालमानाने दुसरें रूप घेणारी असते, असें नव्हे, तर एकाच वेळींहि अनेक रूपें घेणारी, आणि त्या अनेक रूपांतूनहि आपलें असें एक विशिष्ट रूप व्यक्त करणारी असते. भाषेची व्यक्तिपरत्वें, ज्ञातिपरत्वें, स्थानपरत्वें जीं अनेक रूपें दिसतात तीं यामुळेच. परंतु या अनेक रूपांतून पुन: सर्व रूपांना समान असणारें, सर्व रूपांचा समन्वय करणारें असें एक रूप असतेंच. बोलींच्या विविधतेंतहि एकता साधणारें प्राकृतिक रूप तें हेंच.

आता, प्रश्न असा की, बोलभाषेचें यथावाच्य लेखन करतां येणार नाही का ? आणि आल्यास करूं नये का ? वस्तुत: करतां आल्यास न करावयाला कांही एक कारण नाही. फार तर एखादा विचित्र उच्चार रूढ लिपींत उतरवितां येणार नाही. पण येथे खरा प्रश्न असा की, लेखनाचा प्रमुख उद्देश कोणता ? आणि तो उद्देश पूर्ण होण्यासाठी लेखनाने कोणतीं पथ्यें पाळावींत ? मला वाटतें, ह्या प्रश्नांच्या उत्तरांतच उक्त भाषा आणि ग्रांथिक वा लिखित भाषा यांचे संबंध स्पष्ट व्हावेत, आणि पर्यायाने शुद्धलेखनाच्या प्रश्नावरहि प्रकाश पडावा.

कोणत्याहि मनुष्याच्या मनांत कांहीहि आलें तरी तें त्याने स्वत:शीं बोलूं नये, असें कोणी म्हणणार नाही. परंतु तेंच जर चारचौघांदेखत बोलावयाचें असेल तर आपोआपच त्याच्या बोलण्यावर थोडेंफार बंधन पडेल. हे चारचौघे जर ( बोलणाऱ्याहून ) प्रतिष्ठित असतील, तर बोलणाराहि अधिक तारतम्याने बोलेल. हें तारतम्य केवळ बोलण्यामागील आशयाबद्दलच असणार नाही, तर ज्या बोलभाषेंत बोलावयाचें त्या भाषेबद्दलहि असेल. म्हणजेच बोलणारा आपल्या स्वत:च्या खास बोलींत बोलण्याऐवजी इतर बोलींना समान असणारी जी

कोणती प्रमाण बोलभाषा असेल त्या भाषेंत बोलेल. प्रतिष्ठितांच्या समाजांत वा सभासंमेलनांत बोलली जाणारी भाषा ती हीच होय. जी गोष्ट भाषणाची तीच गोष्ट लेखनाची. किंबहुना लेखनाबाबत ती अधिक कटाक्षाने पाळावी लागेल. कारण लेखन हें केवळ समकालिनांसाठीच नसतें, तर तदनंतरच्या काळांतील लोकांसाठीहि असतें. तसेंच जें लिहावयाचें तें अनेक लोकांना कळावें, व अधिक काळ टिकावें हा जसा एक हेतु असतो, तशाच त्यांतून कांही तात्त्विक गोष्टी स्पष्ट करण्याचा, शास्त्रीय विचार मांडण्याचा, तर्कशुद्ध नि काटेकोर विवेचन करण्याचा इत्यादि अनेक प्रकारचा हेतु असूं शकतो. भाषणाचें व लेखनाचें जन्मजात प्रयोजनच मुळीं भिन्न आहे; आणि हें भिन्न प्रयोजनच त्यांच्या वेगळेपणाला व बोलभाषेपेक्षा लेखनभाषेला शिष्ट-मान्यता देण्याला कारण होतें.

आता ही शिष्टसंमत भाषा म्हणजे काय ? आणि ती निर्माण कशी होते ? एखाद्या भाषेंतील समकालीन अशा बोलींपैकी कोणत्यातरी एखाद्या बोलीला जें महत्त्व येतें त्याला कांही खास कारणें असतात असें दिसतें. मराठीचेंच उदाहरण घेतलें तर असें दिसतें की, मराठीच्या स्थानपरत्वे वेगवेगळ्या लकबा असणाऱ्या ज्या अनेक बोली आहेत, त्यांपैकी देशावरच्या बोलीला जें शिष्टसंमत आणि ग्रांथिक महत्त्व आलें, तें यादवांच्या राजवटीमुळे. सुरवातीचे मराठीचे मातबर ग्रंथकार झाले तेहि या प्रदेशांतच. ज्ञानेश्वर आळंदीचा, तुकाराम देहूचा, रामदास साताऱ्याजवळचा. ज्या संतपरंपरेमुळे मराठी भाषा जगली, वांचली आणि समृद्ध झाली तिच्यांतील हीं कांही नांवें, व त्यांचीं वसतिस्थानें. शिवाजीने मराठी राज्यस्थापनेचे धडे घेतले ते पुणेंप्रांतींच. पेशव्यांनी तर पुण्याला आपली राजधानीच केली. पुणें व सातारा हीं तेव्हाचीं दोन राज्यनगरें. अव्वल इंग्रजींत पुण्याबरोबर मुंबईलाहि महत्त्व आलें. कोश, व्याकरणें, शालोपयोगी पुस्तकें, नियतकालिकें इत्यादींच्या द्वारा मराठी कसदार करणारे संस्कृत-इंग्रजी पंडित मुख्यतः येथलेच. या भागांतील सुशिक्षितांच्या नागर मराठीला कसें महत्त्व येत गेलें हें यावरून लक्षांत यावें. समाजांतला शिकलासवरलेला व चारचौघांत भाषणें करणारा व प्रसंगीं लेखनहि करणारा जो वर्ग असतो त्या वर्गाची चारचौघांत सभ्यपणें बोलण्याची भाषा ही ह्या रीतीने शिष्टमान्यता पावते. एखाद्या भाषेंतील अनेक बोलींपैकीं एखाद्याच बोलीला विशेष महत्त्व कां येतें ह्याचीं हीं स्थूल कारणें. परंतु सामान्यपणें शिष्टमान्यता पावलेल्या एखाद्या स्थानिक बोलीची ( dialect ची ) पुन: बोली, लेखी, अशिष्ट, शिष्ट इत्यादि रूपें आढळतातच आता अशा एखाद्या बोलीला वा बोलींतील विशिष्ट रूपाला जी विशिष्टमान्यता मिळते ती कां ? आणि कशी ? अनेक बोलींपैकी एखाद्या बोलीला शिष्टमान्यता मिळण्याचीं जीं स्थूल कारणें वर सांगितलीं तींच कारणें येथेहि सांगतां येतील. शिवाय घरांत, समवयस्कांच्या खाजगी बैठकींत भाषेला जो सैलपणा येतो तो सभासंमेलनांत वा स्त्रीपुरुषमिश्र बैठकींत टिकणार नाही. ग्रंथलेखन करीत असतांना तर शब्दांचा वा शब्दरूपांचा काटेकोरपणा अधिकच वाढेल. ग्रंथलेखन ही बोलीला मिळणाऱ्या प्रतिष्ठेची प्रमुख कसोटी. व्याकरणमान्यतेने तिला अधिकच बळकटी येते. व्याकरण हें वस्तुतः भाषेची वस्तुस्थिति सांगणारें शास्त्र; परंतु पाणिनीपासून व्याकरणकारांची जी परंपरा निर्माण झाली आहे ती म्हणजे शिष्टमान्य म्हणजेच मुख्यतः ग्रांथिक भाषेची वस्तुस्थिति सांगणारी, आणि पर्यायाने 'शुद्धाशुद्धा'चा विवेक करणारी. येथे शुद्ध याचा अर्थ केवळ शिष्टमान्य, व्याकरणसंमत. भाषेचें हें शिष्टमान्य, ग्रांथिक स्वरूप व शिष्टमान्यता न मिळालेले केवळ बोली स्वरूप यांत तफावत पडत जाते ती यामुळे. भाषांचा इतिहास सांगतो की भाषेला प्राप्त होणारी ग्रांथिकता आणि व्याकरणमान्यता ह्या भाषेची प्रौढता जशा व्यक्त करतात, तशाच त्या तिच्या वृद्धापकालाचीहि निशाणी ठरूं शकतात

ग्रांथिकतेच्या व व्याकरणतंत्राच्या चौकटींत भाषा गुदमरते, आणि अखेर आपल्या वारसाला जागा करून देऊन स्वतः इतिहासजमा होते. मात्र याला एक उतारा आहे; आणि मराठीच्या बाबतींत तोच तारक ठरला आहे. ग्रांथिक स्वरूपांत भाषा प्रौढ प्रतिष्ठित होत असतांनाच तिने आपला बोली व्यवहारहि सतत आणि सारख्याच उमेदीने चालू ठेवला तर ती ग्रांथिकतेमुळे गळून पडण्याऐवजी वा इतिहासजमा होण्याऐवजी अधिकाधिक रसरशीत होत जाते. शिष्टमान्य भाषेचा स्वभावच असा आहे की ती हळूहळू साचेबंद होण्याची शक्यता असते. त्याच त्या अर्थाने विशिष्ट शब्दांचा वा शब्दप्रयोगांचा वरचेवर वापर झाल्याने त्यांतील मूळ जिवंत अर्थसौंदर्य सांकेतिकतेने डागाळूं लागतें; एक वेळच्या अर्थगर्भ प्रतिष्ठित भाषेंतला अर्थ क्षीण होत जाऊन प्रतिष्ठितपणाचा केवळ दिखाऊ मुलामा उरतो, आणि येथेच बोलभाषा तिच्या साह्याला धावून येते–येऊं शकते. जिवंतपणा, खेळकरपणा आणि जोरकसपणा हे तिचे (बोलीचे) जन्मजात गुण असल्यामुळे, अर्थाने क्षीण पण अवडंबराने पुष्ट झालेल्या ग्रांथिक भाषेला ती आपल्यांतील लवचिक, अर्थवाही, जिवंत आणि जीवनाच्या बहुविध क्षेत्रांत केलेल्या संचारामुळे आपल्यांत मुरविलेले नवे नवे शब्द आणि नवे नवे शब्दप्रयोग पुरविते आणि तिला–म्हणजे ग्रांथिक भाषेला पुनः निरोगी करून तिची थांबूं पाहणारी वाटचाल पुढे चालू करविते. ग्रांथिक भाषेला मिळणारी ही एक प्रकारची संजीवनीच आहे. मराठी भाषेला ही संजीवनी सतत मिळत गेल्यामुळे ती आजवर अनेक अवस्थांतरांतून जीवंत राहिली आहे. वस्तुतः मराठी भाषा तिच्या जन्मानंतर दोन तीन शतकांतच ग्रांथिक बनली; तत्त्वज्ञान सांगूं लागली; खंडन-मंडन करूं लागली; प्रबंध रचूं लागली; आणि काव्यहि करूं लागली. महानुभावांनी रचलेल्या व्याकरणाने मानसन्मानाची सनदहि तिला देऊन टाकिली. सामान्यतः उत्तरायुष्यांत जे सोपस्कार व्हावयाचे ते तिच्या किशोरावस्थेंतच झाले; पण ते अखेरचे ठरले नाहीत. कारण तिचा सत्कार जसा पंडितांनी, तत्त्वज्ञान्यांनी, प्रबंधकारांनी केला तसाच, किंबहुना त्यांहून अधिक जिव्हाळ्याने साऱ्या महाराष्ट्रांतील अठरापगड जातींनी आपल्या अनेकविध दैनंदिन जीवनांत तिचा वापर केला. बोलीभाषा आणि लेखी भाषा यांचा असा एकाच वेळीं समांतर पण अगदी निकट प्रवाह वाहत असल्याने मधूनमधून त्यांचें पाणी परस्परांत मिळून मिसळून गेलेलें दिसलें तर नवल नाही. परंतु या रीतीनें त्या परस्परांना पूरक झालेल्या असल्या तरी त्यांचें वेगळेंपण नष्ट झालेलें नाही; नव्हे होणारहि नाही; (आणि होणें इष्टहि नाही.) बोली आणि लेखी या दोघी जरी मूळ एकाच भाषेचीं लेकरें असलीं तरी त्या दोघी भिन्न आहेत आणि भिन्न राहण्यांतच त्या दोघींचेंहि आणि पर्यायाने मूळ मराठीचेंहि हित आहे. ज्या ज्या वेळीं त्यांना परस्परांचें साहाय्य लागतें त्या त्या वेळीं त्या जर भिन्न असल्या तरच त्या तें देऊं शकतील. त्यांच्यांत अभेद कल्पिणें आणि प्रत्यक्षांत तो उतरविण्याचा प्रयत्न करणें म्हणजे त्यांच्यांतील जिवंतपणा आणि सर्जनशीलता नष्ट करणें होय. भाषेंतील जिवंतपणा व सातत्यरक्षण टिकविण्यासाठी बोली भाषेहून लेखी भाषा निराळी असणेंच अवश्य आहे. मात्र याचा अर्थ असा नाही की ते निराळेंपण मुद्दाम होऊन कृत्रिमपणें चालूं ठेवावें. बोली व लेखी यांना एक करण्याचा कृत्रिम प्रयत्न जसा फोल ठरेल, तसाच हाहि फोल ठरेल. त्या दोघींना त्यांच्या जन्मजात स्वतंत्र स्वभावाप्रमाणे जाऊं देणेंच केव्हाहि योग्य आणि सर्व दृष्टींनी हितकर ठरेल.

बोली भाषा आणि लेखी भाषा यांच्या स्वभावांतच जर या प्रकारचा मूलभूत फरक असेल, तर शुद्धाशुद्ध कशाला म्हणावें ! आणि शुद्धाशुद्धाचा विवेक कसा करावा ! येथे शुद्ध याचा अर्थ फक्त शिष्टसंमत, ग्रांथिक व व्याकरणमान्य; आणि अशुद्ध म्हणजे अजून शिष्टमान्य

अनुक्रमणिका

न झालेलें म्हणजेच केवळ बोलींतच वापरलें जाणारें व म्हणून ग्रंथगत न झालेलें, व्याकरण-मान्यता न मिळालेलें. बोली आणि लेखी यांचे वर जे परस्परसंबंध पाहिले, त्यावरून आज जें अशुद्ध तें उद्या शुद्ध होणार नाही, असें नाही; होईलहि. भाषेचा इतिहास याला साक्ष आहे. संस्कृतांत जें विभ्रष्ट झालें तेंच हळूहळू न्यात्यस्तोमाने शुद्ध बनलें. प्रथम भ्रष्ट म्हणून दूर केलेल्या प्राकृतांनाच नंतर प्रतिष्ठित ग्रांथिक रूप आलें; आणि वररुचि, हेमचंद्र यांसारख्या वैयाकरणांनी त्यांचीं व्याकरणें रचून त्यांचा सन्मानहि केला. याचीच पुनरावृत्ति मराठी, गुजराती वगैरे अर्वाचीन देशी भाषा जन्माला आल्यानंतरहि झाली. 'प्रयोगशरणाः वैयाकरणाः' हें तत्त्व कोणत्याहि काळीं सारखेंच लागू पडणार. दादोबादि वैयाकरणांनीहि तत्कालीन 'शिष्ट' मराठी रूपाला व्याकरणांत स्थान दिलें तेंहि यामुळेच. अर्थात् हें विशिष्ट रूप एका विशिष्ट बोलीचें होतें, आणि त्या बोलीच्या महत्त्वाला इतिहासाचा व परंपरेचा आधार होता हा भाग वेगळा.

आता, येथे असा एक प्रश्न विचारतां येईल की, शिष्ट आणि अशिष्ट यांची सीमारेषा जर बदलत असते, आणि कालचें अशिष्ट आज शिष्ट होण्याची प्रक्रिया भाषेंत संतत चालू असते, तर मग आज मराठीच्या जुन्या शिष्ट रूपांत कोणी नवीन शिष्ट शिरलें आहेत का यांचा विचार करण्याची वेळ आली नाही का? दादोबांनी शुद्धाशुद्धाचा म्हणजे शिष्टाशिष्टाचा विचार करून आज शंभरावर वर्षे लोटलीं. मध्यंतरीं त्याचा दोनदां पुनर्विचारहि झाला. एकदा १९०४ सालीं का. नां. साने यांची सरकारने कमेटी नेमली तेव्हां, आणि दुसऱ्यांदा १९२९ सालीं म. सा. परिषदेने शुद्धलेखन-समिति नेमली तेव्हां. त्यालाहि थोडाफार काळ लोटला. अर्थात् मराठी भाषेच्या बोली वा लेखी स्वरूपांत त्यामुळे फार फरक पडला आहे वा त्यांत कांहीएक आकस्मिक स्थित्यंतर झालें आहे, असें नव्हे. परंतु जर कुणाला पुनः एकदा विचार व्हावा असें वाटत असलें तर त्यालाहि हरकत नसावी; किंबहुना शुद्धलेखनाबाबत जे जुने-नवे पक्षोपपक्ष झाले त्यामुळे व एकंदरच त्या बाबतच्या सार्वत्रिक उदासीनतेमुळे, जें कांही अराजक माजलें आहे तें थांबविण्याच्या दृष्टीनेहि शुद्धलेखनाचा फेरविचार होणें अगत्याचें आहे.

शुद्धलेखनाचा विचार करतांना प्रथम लेखनाचा जन्मजात स्वभाव आणि त्याचें प्रयोजन यांचा विचार करावा लागेल. या विचाराला पुनः परंपरेचा—व्युत्पत्तीचा—आधार द्यावा लागेल. स्पष्टार्थता आणि निश्चितार्थता यांचाहि त्यांत अंतर्भाव करावा लागेल. सुलभता ही फसवी आहे, अशास्त्रीय आहे आणि म्हणून ती एतद्विचारांत सर्वथा त्याज्य होय.

साकळूं पाहणाऱ्या शिष्टमान्य लेखी भाषेला बोली भाषा संतत जीवनसत्त्व पुरवीत असते. तेव्हा कालचे अशिष्ट प्रयोग आज शिष्ट होणें अशक्य नाही. परंतु या नवशिष्टांवरहि कांही संस्कार झालेले आहेत का हें पाहावें लागेल; म्हणजे त्यांच्या खऱ्याखोट्याची सहजच पारख लागेल. नाटककादंबऱ्यांतील संभाषणलेखनांत जशी बोली भाषा येऊं लागली तशीच ती लघुनिबंधलेखनांतहि येऊं लागली. लघुनिबंध हा स्वभावाने संभाषणात्मक असतो, स्वगतात्मक असतो. या दृष्टीने त्याचें लेखन बोलभाषेंत साजून गेलें. परंतु त्याच पद्धतीने गंभीर विषयावरहि लेखन आणि तेंहि सुबुद्धांकडून होऊं लागतांच त्यांतून बोलीला मिळूं पाहणारी शिष्टमान्यता कितपत शास्त्रपूत, कितपत स्वीकरणीय याचा विवेक करणें अगत्याचें आहे. बोलीलाच सरसहा लेखी करण्याचा हा प्रकार आहे, आणि तो त्या दोघींच्याहि स्वभावधर्माच्या व प्रयोजनाच्या विरुद्ध आहे.

बोली आणि लेखी यांच्यांत अभेद करण्यांत, म्हणजे उच्चारानुसारी लेखन करण्यांत आणखी एक अडचण आहे. तिचाहि येथे विचार होणें अगत्याचें आहे. उच्चारानुसारी

लेखन करतांना प्रमाण उच्चार कुणाचे मानावयाचे? शिष्टांचे खरें, पण हे शिष्ट तरी कोण ठरविणार? आणि या शिष्टांखेरीज बाकीचे अशिष्ट म्हणणें योग्य होईल का? शिवाय, मराठीच्या अनेक बोली आहेत. त्या बोली बोलणाऱ्यांत पुनः शिष्ट-अशिष्ट असा फरक होणार नाही का? आणि झाल्यास निरनिराळ्या बोलींतील शिष्टांच्या उच्चारांत एकवाक्यता कशी साधावयाची? समजा, ती कशीतरी, म्हणजे कृत्रिमपणें साधली तरी ते सारे शिष्ट उच्चार सर्व शिष्टांच्या बोलण्यांत सारख्याच रीतीने केले जातील का? मला वाटतें, या ठिकाणीं, पुनः हात टेकावे लागतील. शिष्ट समजल्या गेलेल्या एकाच परिस्थितींतल्या कोणत्याहि दोन व्यक्तींच्या उच्चारांत सारखेपणा नसतो. ध्वनियंत्राच्या साहाय्याने हें केव्हाहि सिद्ध करतां येईलच; पण केवळ नीट अवधान देऊन ऐकिलें तरीहि हें लक्षांत येईल. मग अशा एकंदर परिस्थितींत उच्चारानुसारी लेखन करावयाचें म्हणजे कसें करावयाचें? ज्याला अनुसरावयाचें तेंच जर या प्रकारें विभिन्न तर लेखनाने कुणाचें अनुयायित्व पत्करावें? अर्थात् लेखनाने आपल्या स्वभावधर्माप्रमाणे व प्रयोजनाप्रमाणे स्वतःचें असें प्रमाण ठरवावें, याच उत्तराकडे अखेर आपल्याला वळावें लागेल.

मराठी भाषा ही संस्कृतप्राकृतोत्पन्न असल्यामुळे तिच्यांत तद्भव शब्दांचा भरणा विशेष आहे. तसेंच तिने आपल्या जन्मानंतर लवकरच प्रसंगोपात्त थेट संस्कृताची पुष्कळशी मदत घेतल्यामुळे तत्सम संस्कृत शब्दहि तिच्यांत कमी नाहीत. शेजारच्या द्राविडी भाषेचा सतत संबंध येत गेल्यामुळे द्राविडी वळणाचे शब्दहि तिच्यांत आढळतातच; आणि या साऱ्यांच्या जोडीला फार्शी-उर्दूने अनेक शतकें राज्य केल्यामुळे फार्शी-उर्दूचा संपर्कहि कांहीं थोडाथोडका झाला नाही. हा झाला अठराव्या शतकापर्यंतचा स्थूल हिशेब. एकोणिसाव्या शतकांत पुनः पाश्चात्य भाषांशीं विशेषतः इंग्रजीशीं तिचा संबंध आला. परंतु या सर्वांनी तिला मुख्यतः शब्दांनी श्रीमंत करण्यापलीकडे फारसा प्राकृतिक बदल केला नाही. फार्शीउर्दूचे कांहीं उच्चार शिरले व इंग्रजी वाक्यांचें वळण थोडेफार उतरलें इतकेंच; परंतु या सर्व गोष्टी तिने पचविल्या. हीच गोष्ट संस्कृतने दिलेल्या तत्सम शब्दांची. त्यांचेहि उच्चार विशेषतः व्यंजनान्त व ऱ्हस्व-दीर्घान्त—तिने आपल्या स्वभावधर्माप्रमाणे मराठी केले. राहता राहिला प्रश्न तद्भव शब्दांचा व त्यांच्या व्याकरणरूपांचा. येथेहि ऱ्हस्वदीर्घापेक्षा खरा प्रश्न पडतो तो दिवसेंदिवस उच्चारांतून गळूं पाहणाऱ्या अनुनासिकांचा-अनुच्चारित अनुस्वारांचा. सारा गदारोळ माजतो तो तेथेच.

अनुच्चारित अनुस्वारांचें लेखन करावें की न करावें ह्या प्रश्नाचा विचार म्हणजे मुख्यतः उच्चारानुसारी लेखन असावें कीं नसावें ह्या प्रश्नाचा विचार. उच्चारानुसारी लेखन करणें म्हणजे आपण बोलतों तसेंच लिहिणें; म्हणजेच पर्यायाने बोली भाषा आणि लेखी भाषा यांत फरक न करणें. परंतु त्या स्वभावतः भिन्न असल्यामुळे व त्यांचीं प्रयोजनेंहि भिन्न असल्यामुळे त्यांना एकरूप करण्याचा कितीहि प्रयत्न केला तरी त्या भिन्नच राहणार, याचें विवेचन वर आलेलेंच आहे. दोहोंना एकरूप दिल्याचा आभास कदाचित् कांहीकाल टिकेलहि. पण ती आभासावस्थाच असल्याने लवकरच ती विरून जाईल व पुनः बोली आणि लेखी आपापलें भिन्न रूप घेतील. अनुच्चारित अनुस्वार याला अपवाद नाहीत. याचा अर्थ असा मात्र नव्हे की, जे निरनुनासिक उच्चार कालमानाने शिष्टसंमत झालेले आहेत त्यांचें लेखनहि केवळ

परंपरेच्या अंधश्रद्धेने व बोली व लेखी यांना भिन्न ठेवण्याच्या अट्टाहासाने सानुनासिक वा सानुस्वार करावे. अनुस्वारांच्या वा इतर कोणत्याहि उच्चारांच्या लेखनाबाबत शास्त्रीय विचार करतांना शास्त्रपूत अशी एखादी कसोटी लाविली पाहिजे अर्थात् ही कसोटी बोली व लेखी यांचा स्वभाव, त्यांचीं प्रयोजनें, त्यांच्या वांशिक परंपरा आणि स्पष्टार्थनिश्चिति इत्यादींच्या विचारानेच ठरवावी लागेल. शिष्टमान्यतेलाहि विसरतां येणार नाही. मात्र एकदा का ही कसोटी ठरली, की मग त्या कसोटीला उतरतील ते अनुच्चारित ( असले तरी ) अनुस्वार ठेवावयाचे व इतर गाळावयाचे, हें कटाक्षाने पाळलें पाहिजे; नव्हे तें सर्वसंमतहि झालें पाहिजे. मराठींत असे कांही अनुस्वार शिरले आहेत की त्यांच्या अस्तित्वाचें कांही एक कारण नाही; ( उदाः—हंस; कंस). केवळ रूढीने ते राहिले इतकेंच. अनुस्वारांच्या काटेकोर विचारांत त्यांना प्रथम काट दिला पाहिजे. परंतु जे अनुस्वार उच्चारांतून गळाले आहेत परंतु व्युत्पत्तीचा ज्यांना आधार आहे, व ज्यांच्यामुळे अर्थभेद स्पष्ट होण्याला आयती मदत होते आहे, ते जरूर ठेवले पाहिजेत; ( उदाः—नांव, नाव ). यांच्या जोडीला अर्थभेदाचा संबंध नसूनहि ज्यांचें अस्तित्व व्युत्पत्तीने सिद्ध करतां येतें अशा अनुस्वाराचेंहि लेखन त्याज्य न ठरवितां फार तर वैकल्पिक करावें. कारण भाषेच्या स्वभावधर्माप्रमाणे उच्चार बदलत जाणारच व तदनुसार कालांतराने लेखनांतहि बदल होणारच. परंतु कालांतराने जी गोष्ट होणार ती आज करण्याचा अट्टाहास धरणें कितपत योग्य आहे ? अशा प्रकारचा अट्टाहासच धरायचा असेल, आणि तो विद्वन्मान्यहि होणार असेल तर स्थिर स्वरूपाची, अनेक बोली बोलणाऱ्यांना परस्परांशीं जिच्यांत लेखन-व्यवहार करतां येईल अशी, निदान कांही कालपर्यंत तरी समाजाचे सांस्कृतिक धन ‘ अक्षर ’ करूं शकेल अशी प्रमाण ग्रांथिक भाषा निर्माण होण्याची मुळीं आशाच नको.

लेखन हें जसें सर्वसामान्य माणसाला आपला कोणताहि विचार वा कोणतीहि भावना व्यक्त करण्याचें एक साधन असतें, तसेंच तें विचारवंतांचेहि विचार व्यक्त करण्याचें माध्यम असतें. समाजांतल्या विद्वानांनी, शास्त्रज्ञांनी, तत्त्वज्ञांनी जें मौलिक धन गोळा केलें असेल तें ह्याच्याच साह्याने जतन करतां येतें; आणि म्हणून तें जितकें निःसंदिग्धपणें बांधेसूद, स्पष्टार्थ-वादी असेल तितकें तें अधिक समर्थ ठरेल. लेखनाचें हें प्रमुख प्रयोजन कदापि दृष्टीआड करून चालणार नाही. ● ● ●

अनुक्रमणिका

प्रा. सुरेश म. डोळके

# 'वत्साहरणां'तील काव्य : एक मूल्यमापन

## काव्यप्रयोजन

ब्रह्मदेवाने केलेलें 'वत्सहरण' नव्हे तर श्रीकृष्णाने केलेलें 'वत्साहरण' व त्यांतून होणारें श्रीकृष्णाचें अनन्यश्रेष्ठत्व यावरच कवीला 'वत्साहरणां'त भर द्यावयाचा आहे. हृदयांतली अनुभूति–त्या अनुभूतीचे सारे आत्मीय रस–गंध शब्दांनी व्यक्त करतां येणें शक्य नसले [१०], तरी कवीच्या अंत:करणांत श्रीकृष्णभक्ति इतकी ओसंडून वाहत होती की, ती काव्यरूपाने व्यक्त केल्यावाचून कवीला राहवत नाही. श्रीकृष्णगुणस्मरणाच्या आनंदाने प्रफुल्ल झालेल्या त्याच्या अंत:करणाचा रसनात्मक अनुवाद म्हणजे प्रस्तुत काव्य होय. गोपस्त्रियांनी ज्या श्रीकृष्णाचे गुणानुवाद गातांच तो ध्वनि ऐकून दिशारूपी स्त्रियाहि मंगल, कल्याणमय झाल्या [३३], त्या श्रीकृष्णकथेचें गायन केल्याने आपलें जीवनकार्य कृतार्थ होईल [४६], श्रीकृष्णकथा ही 'अज्ञान–तमाचि तरणि' व 'कैवल्यपदाची निसाणि' आहे [४४], किंबहुना—

'कवण्हांइ जप–तप–तिर्था । याग–दान–व्रता
श्रीकृष्णमहिमेसीं समता । ते आथिचि ना' (४२)

अशी कवीची श्रद्धा होती. अर्थात्, या काव्यांतील ओवी न् ओवी कवीच्या अंत:करणांत असलेल्या श्रीकृष्णाविषयीच्या अतीव आदराने ओथंबलेली आहे. व्यक्तिवर्णन असो, निसर्ग-वर्णन असो की स्थलवर्णन असो—त्या सर्वांतून कवीच्या हृदयांत असलेला श्रीकृष्णाविषयीचा असीम आदरच अभिव्यक्त होतो.

पण, केवळ श्रीकृष्णाचे गुणानुवाद गाणें, हृदयांत ओसंडणाऱ्या भक्तिभावनेचा आविष्कार करणें एवढाच कवीचा या काव्यांत उद्देश आहे असें म्हणतां येणार नाही. श्रीकृष्ण-श्रेष्ठत्वाच्या अनुषंगाने महानुभाव तत्त्वज्ञानाचें अपरूकत्व प्रतिपादन करणें हाहि त्याचा उद्देश आहे. प्रस्तुत काव्याच्या उत्तरार्धात, ब्रह्मदेवाच्या मुखाने, त्याने महानुभाव तत्त्वज्ञानाचें निरूपणच केलें आहे.

'सांडा सांडा अन्यें भजनें । काई नाईका वेद–पुराणें
मुजिचे ना आनें कव्हणें । एकु श्रीकृष्णु–सेवा' (४०)

या ओवींत किंवा 'सांडा सांडा अहंकारा : अनुसरा श्रीचक्रधरा' [३७४] या चरणांत श्रीकृष्णश्रेष्ठत्वाच्या अनुषंगाने महानुभाव तत्त्वज्ञानाचें अपरूकत्व तर तो प्रतिपादन करतोच, पण महानुभाव पंथाच्या प्रचाराच्याहि क्षेत्रांत हलकेंच पाऊल टाकतो. श्रीकृष्ण–श्रेष्ठत्व व महानुभाव तत्त्वज्ञानाचें अपरूकत्व यांनी प्रस्तुत काव्यांतील ओवीन् ओवी रंगलेली आहे यांत शंका नाही.

## कवीचें व्यक्तित्व : संत व कवि

श्रीकृष्णकथा ही नऊहि रसांचें विधान असली तरी भक्तिरसाचाच आविष्कार कवीनी आपल्या काव्यांत केला पाहिजे; कारण, वेदांनाहि अगम्य असलेला श्रीकृष्ण केवळ भक्तीनेच 'सुलभ' आहे अशी कवीची धारणा होती.

'उपमा, श्लेष इत्यादींनी सर्व लोकांचें रंजन करूं की संसारबंधनापासून सोडविणाऱ्या श्रीकृष्णाचे पवाडे गाऊं ?—प्राकृत लोकांना मानवेल अशा सुसंगत कथेचें गायन करूं की संतांचें जीवन अशा परब्रह्माची कीर्ति गाऊं ?—सुंदर व अर्थगर्भ बोलांनी कथा वानूं, त्यांत सर्व रसांचा परिपोष घडवूं की नीरसपणें श्रीकृष्णाची भक्ति करूं ?' [ १४–१६ ] असा संभ्रम कवीने व्यक्त केला आहे. यावरून दोनहि भूमिका कवीला अवगत होत्या हें उघड दिसतें. कवीचें जीवन संताचें, साधकाचें असल्यामुळे भक्तांनाच या हरिकथेची गोडी कळेल, किंबहुना आपलें हें काव्य भक्तांकरिता [ २०, ५०२ ], संतांकरिता [ २२, २४, २६ ], महंतांकरिता [ ५०१ ] व निवृत्तांकरिताच [ ४९५ ] आहे असेंहि तो स्पष्ट बजावतो. पण हें बजावीत असतांनाहि

'जैसी कुलस्त्रिएची गुणसंपत्ति । भोगावि एकेचि पति
तैसी हरिकथारसीं रति । भगता वांचौनि नाहिं ' ( २० )

अशी सुंदर व भावनोत्कट उपमा द्यायला मात्र तो विसरत नाही.

'जो चंद्रु चकोरांचें जीवन । अमृतें निववि त्रीभुवन
तोहि गुणें एकें निरांजन । मानि कलावतु ' ( २३ )

या हृदयंगम दृष्टान्तावरून, श्रीकृष्णकथेच्या नूतनत्वाची अमृत, सोनें आणि मेरु यांच्याशीं तुलना करणाऱ्या त्याच्या कल्पकतेवरून [ २९, ३० ] व 'संतजनांचें चित्त चमत्करैल अशा रीतीने मीं हें श्रीकृष्णचरित्र सांगेन' या त्याच्या आश्वासनावरून [ २२ ] कवि संत-प्रवृत्तीचा असला तरी त्याची भूमिका केवळ संताची किंवा भक्ताची नसून ती 'कवी'चीहि होती असें स्पष्ट दिसतें. किंबहुना,

'पुराणांतले बोल आर्ष ( खडबडीत ) आहेत. पण माझी 'परबंध–रचना' मात्र अपूर्व [ नवल ] झाली आहे. इतकी अपूर्व, की सुगंधित केवड्याच्या परिमलाप्रमाणे माझ्या काव्यांतील शब्द–सौरभ रसिकांचें चित्त वेधून घेईल.' [ १७ ].

असें म्हणण्यांत कवीची स्वतःच्या 'कवित्वा'विषयीची आत्मविश्वासपूर्वक जाणीवच व्यक्त होते. तो स्वतःला 'कवि' तर मानतोच [ ८ ], पण ज्यांच्या शब्दाशब्दांतून भाव–गंध दरवळत आहे असा रससिद्ध कवि मानतो. पुराणापेक्षा माझी 'प्रबंध–रचना' अधिक श्रेष्ठ, किंबहुना अपूर्वच [ नवल ] आहे हा त्याचा आत्मविश्वासहि त्याच्या कवित्वविषयक जाणिवेंतूनच निर्माण झाला आहे. यावरून, संतत्व व कवित्व या दोनहि भूमिकांचा मिलाफ प्रस्तुत कवीच्या व्यक्तित्वांत झाला होता असें म्हटलें पाहिजे. आपण निवृत्तांकरिता प्रबंधरचना करीत आहों ही जशी त्याची भूमिका होती तशीच, आपण काव्य व तेंहि अपूर्व असें काव्य निर्माण करीत आहों याचीहि आत्मविश्वासयुक्त जाणीव त्याला होती. त्याच्या संतत्वाच्या भाव-प्रवाहावर कवित्वाचीं कमलपुष्पें उमललेलीं आहेत असें म्हणावें लागेल.

'भक्तिरासिं नाही आदरु । जेया कविं पढिये श्रींगारु
तेहीं तन्हि सौंदरांचा सौंदरु । राओ मुरारीचि वानावा ' ( ४७ )

या ओवींत कवीने भक्तीचा स्वतंत्र रस म्हणून उल्लेख केला आहे; इतकेंच नव्हे तर 'श्रुंगारु', 'हस्य', 'करुणा', 'रौद्रु', 'अद्‌भुत', 'भयानकु', 'बिभछु', 'विरु' आणि 'सांतु' [ ५१–५४ ] या संस्कृतांतल्या नवरसांपेक्षा भक्तीला तो अग्रगण्य मानतो. भक्तीचा रस म्हणून उल्लेख करण्यांत व संस्कृतांतल्या नवरसांपेक्षा भक्तीला अग्रगण्य मानून त्याप्रमाणे प्रत्यक्ष काव्यनिर्मिति करण्यांत, मराठी कवींत, प्रस्तुत कवीचा क्रम बहुधा पहिला लागेल.

### आत्मपरतेची क्षीणता

कवीच्या हृदयांत श्रीकृष्णभक्तीची भावना ओसंडून वाहत होती. हृदयांतल्या भक्ति-भावनेचा आविष्कारच आपण या काव्यांत केला असें त्याचें म्हणणें. अर्थात्, भावनेच्या दृष्टीने हें काव्य प्रतीतिकारक व्हायला पाहिजे. आराध्यदैवताविषयीच्या उत्कट भावनेने प्रस्तुत काव्याचा शब्दन् शब्द उजळून निघायला हवा. कारण, त्याच एका भावनेने आपण ही 'प्रबंध–रचना' केली असें तो म्हणतो.

पण हें काव्य भावनोत्कट आहे असें म्हणतां येईल का? ज्या भक्तीविषयी कवीला इतका जिव्हाळा आहे, त्या भक्तिभावनेच्या तरी विमुक्त आविष्काराच्या दृष्टीने प्रस्तुत काव्य उत्कृष्ट आहे का? आणि नसेल तर ते कां नाही?—

अंतःकरणांत भावना किंवा विचारानुभूति अनावर झाली म्हणजे तिच्या आविष्काराला काव्याचें रूप आपोआप प्राप्त होत असतें. तुकारामाच्या काव्याचें असें आहे. उत्कट आत्मप्रतीति हा त्याचा स्थायीभाव. 'वत्साहरणा'च्या बाबतींत असें झालें आहे असें म्हणतां येत नाही. ज्या भक्तीबद्दल कवीला आपुलकी वाटते, त्या भक्तिरसाचाहि विमुक्त आविष्कार प्रस्तुत काव्यांत नाही. तुकारामाचे अभंग वाचून रसिकांचें हृदय जसें उचंबळतें, त्यांच्या हृदयांतल्या भक्तिभावनेला जशी भरती येते, त्या भरतीने डोळ्यांतून अश्रु येतात व या सर्वांचें पर्यवसान जसें एक प्रकारच्या निरपेक्ष आनंदांत होतें—तसा अनुभव प्रस्तुत काव्य वाचून येत नाही.

हें असें कां व्हावें?—कवीच्या हृदयांत जर भक्तीची भावना इतकी ओसंडून वाहत आहे तर तिची प्रतीति हें काव्य वाचतांना वाचकांना कां येऊं नये? माझ्या दृष्टीने 'आत्मपरतेची क्षीणता' हें याचें कारण आहे. वाणी ओबडधोबड किंवा खडबडीत असतांनाहि तुकारामाच्या काव्यांत भक्तीचा जो विमुक्त विलास दिसतो, त्याचें कारण तुकारामाची कमालीची आत्मनिष्ठा; त्याच्या अंतःकरणाची जी भावनात्मक किंवा विचारात्मक क्रिया झाली असेल, तिच्या वाङ्मयीन प्रतिक्रियेशीं त्याने राखलेला पराकोटीचा प्रामाणिकपणा हें आहे. तशी उत्कट आत्मनिष्ठा प्रस्तुत काव्यांत प्रत्ययाला येत नाही.

अघासुर-वर्णन, वृंदावन-वर्णन, यमुना-वर्णन व श्रीमूर्ति-वर्णन हे या काव्यांतील मुख्य वर्णनप्रसंग. या साऱ्या वर्णनांच्या मुळाशीं कवीच्या हृदयांतील श्रीकृष्णभक्तीची भावना तर प्रभावी आहेच, किंबहुना त्या भावनेच्या प्रवाहावरच वर्णनांचे हे तरंग उसळलेले आहेत असें म्हणावयास हरकत नाही. पण, श्रीकृष्णाविषयी कवीला पराकाष्ठेची आत्मीयता वाटत असूनहि या वर्णनांत मात्र आत्मपरतेचा प्रायः अभावच आहे. आत्मपरतेची आत्यंतिकता ही जशी काव्याला बाधक ठरते, तशीच तिची क्षीणता हीहि काव्यांतल्या भावनात्मकतेला अपकारक होते. प्रस्तुत काव्यांत कवीने वर्णन केलेल्या प्रमुख प्रसंगांतून त्याच्या आत्मपरतेचें मूल्यमापन करतां येईल.

### वृंदावन-वर्णन

'श्रीकृष्णाने वृंदावनाला प्रीतीने पाहिलें आणि म्हणून ते वन शोभिवन्त झालें.' कवीने हें वर्णन कां केलें?—'सर्वेश्वराचें तें निरंतर क्रीडास्थान होतें म्हणून—' असें उत्तर स्वतः कवीनेच दिलें आहे [ १२६ ]. अर्थात्, या सर्व वर्णनांतून कवीचा व वृंदावनाचाहि श्रीकृष्णाविषयीचा असीम भक्तिभाव व्यक्त व्हावयास हवा.

कवीने वृंदावनवर्णनाची सुरुवात आत्मीयतेने केली आहे. 'श्रीकृष्णाच्या इंद्रनील मण्यासारख्या कान्तीने वृन्दावनांतले वृक्ष वेधले गेले होते आणि त्यामुळे त्यांनाहि तसाच निळा रंग प्राप्त झाला होता—

' आनंदें फलपुष्परस श्रवत । पृथ्वी साद्रव होउनि गलत
तो पुडरा होतसे अंमृता । पातालिचेया ' (१३०)

'श्रीकृष्णाच्या दर्शनानं प्रमुदित झालेल्या वृंदावनांतल्या वृक्षांवरील फळाफुलांचा रस इतका विपुल प्रमाणांत गळत होता की, त्यामुळे पृथ्वी ओलीचिंब होऊन शिवाय तो पातळांतल्या अमृतांतहि भर घालीत होता ' अशी मनोज्ञ कल्पना करून लगेच कवि म्हणतो—

' वृंदावनिचि सुविलता । गगनिं असे प्रतबिंबत
सुमनसें उमटत । ते जैसें तारांगण
किं दिस असतां तारा न दिसे । ते उणें फेडावेया दोसें
वनश्रीया वेढिले जैसें । अंबर नक्षत्रिसीं ' (१३२, १३३)

'वृंदावनांतल्या वृक्षांची नीलिमा आकाशांत प्रतिबिंबित झाल्यामुळेच आकाश निळें झालें होतें. आणि वृंदावनांत उमललेलीं फुलं !—जणू आकाशांतल्या तारकांचा समूहच होता तो ! किंवा, दिवसा आकाशांतल्या तारका दिसत नसतात. ही उणीव नाहीशी करण्याच्या उद्देशानंच जणू निसर्ग-रमणीनं फुलांचीं नक्षत्रं असलेलं वृंदावनाचं वस्त्र परिधान केलं होतं ! '

वृंदावनांतल्या वृक्षवर्णाशीं, फलपुष्पांच्या मकरंदाशीं व तिथल्या निळ्या वातावरणांतल्या शुभ्रफुलांशीं झालेल्या कवीच्या समरसतेंतूनच या मनोहर कल्पनाचित्रांची निर्मिति झाली आहे. कवीच्या संवेदनाक्षम हृदयावर वरील दृश्यांचें जें बिंब उमटलें त्याचें कांहींसें प्रतिबिंबच वरील कल्पनाचित्रांच्या द्वारा व्यक्त झालें आहे; आणि तेवढ्यापुरती आत्मपरता येथे खचित आहे. पण, या तीनचार ओव्यांनंतर मात्र कवीच्या आत्मपरतेची तीव्रता ओसरली व तो वृंदावनांतल्या वृक्षांच्या तपशिलांत शिरून, त्यांचीं, तिथल्या स्थळांचीं, पशु-पक्ष्यांचीं, ऋषि-मुनींचीं व पुन्हा वृक्षवल्लरींचीं केवळ वस्तुनिष्ठ वर्णनें करण्यात रमला पण या वस्तुनिष्ठ वर्णनांत कवीचें हृदय प्रतिबिंबित होत नाही. त्याच्या हृदयांतल्या भाव-स्पर्शानें या वस्तु जिवंत झालेल्या नाहीत. त्याला वर्णनशैलीची देणगी लाभल्यामुळे हीं वर्णनें कंटाळ-वाणीं होत नाहीत हा भाग वेगळा. एखाद्या त्रयस्थाने तटस्थवृत्तीने केलेल्या वर्णनासारखीं हीं वर्णनें वाटतात. यांतून श्रीकृष्णाचें श्रेष्ठत्व प्रतिपादित होत असलें तरी कवीच्या हृदयाचें दर्शन मात्र होत नाही.

## ' नरेंद्र ' व प्रस्तुत कवि

'वत्साहरणां'तलें वृंदावन-वर्णन वाचतांच 'नरेंद्रा'ने रुक्मिणीस्वयंवरांत केलेल्या द्वारकेच्या वनोपवनांच्या वर्णनांची कुणालाहि आठवण येईल. नरेंद्राने द्वारकेच्या वनोपवनांचें, वनोपवनांतून चाललेल्या वसंताच्या विलासाचें, श्रीकृष्णस्वागतार्थ वनदेवतांनी चालविलेल्या तयारीचें, द्वारकेच्या वनोपवनांतील वृक्ष-वनस्पतींचें, वनस्पति व वनदेवता यांच्या संवादांचें व देवांनी घेतलेल्या वृक्षावतारांचें जें वर्णन १२९ ओव्यांत (रु. स्व. ७२० ते ८४९) विस्ताराने केलें आहे, त्यालाहि

' सकळ सुखांचा रावो श्रीरंगु : उद्यानीं करील संभोगु
म्हणौनि वनस्पति उछावो चांगु : केला भेटावया ॥' (रु. स्व. ७७७)

हेंच कारण आहे,

म्हणजे, प्रस्तुत कवि व नरींद्र यांनी वनांचीं जीं वर्णनें केलीं आहेत, त्यांचें प्रयोजन सारखेंच आहे, दोघांचींहि हृदयें श्रीकृष्णभक्तीच्या भावनेने ओसंडून वाहत आहेत [ नरींद्र ३५, वत्सा० ७ ] व दोघांनाहि आपल्या 'कवित्वा'ची आत्मविश्वासयुक्त जाणीवहि आहे [ नरींद्र ४८८, ८७९; वत्सा० ८, १७ ].

असें असूनहि या दोघांची तुलना करून पाहिली तर प्रथमदर्शनींच एक गोष्ट चटकन लक्षांत भरते. ती ही, की, नरींद्राची प्रतिभा प्रस्तुत कवींत नाही. दोघांच्याहि वर्णनांतून श्रीकृष्णाविषयीचा भक्तिभाव तर व्यक्त होतोच, किंबहुना त्याकरितांच दोघांच्याहि काव्यांचा आविर्भाव झाला आहे. पण, नरींद्राइतकी भावनेची उत्कटता प्रस्तुत काव्यांत नाही. नरींद्राच्या ओळीओळींतून भावनेची उत्कटता ओसंडत आहे; आत्मपरतेच्या उत्कटतेमुळे त्याने वर्णन केलेल्या वनोपवनांतल्या वस्तुवस्तूला जिवंतपणा आला आहे.

कल्पकतेच्या दृष्टीनेहि प्रस्तुत कवि नरींद्राच्या फार मागे आहे. नरींद्राच्या या १२९ ओव्यांची उभारणीच मुळीं कल्पकतेंतून उमाळून आविर्भूत झाली आहे. त्यांच्या उभारणींत कल्पकता आहे, मांडणींत कल्पकता आहे व भावनोत्कटतेच्या आविष्कारांतहि कल्पकता आहे. भावनेची तीव्रता व कल्पकतेचें नर्तन या दोनहि दृष्टींनी नरींद्र हा प्रस्तुत कवीपेक्षा कितीतरी सरस आहे.

हें असें कां व्हावें ?—श्रीकृष्णाविषयींच्या भक्तिभावनेने दोघांचींहि हृदयें ओसंडून वाहत असतांना व त्या भावनेच्या आविष्काराकरिताच दोघांनीहि आपलीं काव्यें लिहिलीं असतांना त्यांच्या काव्यांतल्या भावात्मकतेंत असा फरक कां पडावा ? नरींद्र हा वनोपवनांतल्या वृक्षादिकांशीं इतका समरस झाला आहे की, त्यानें निर्माण केलेलें वृक्षवल्लरींचें संभाषण हें निर्जीव वृक्षवेलींचें नसून नरींद्राच्या भावनोत्कट व कल्पक हृदयाचें तें अंतरंग आहे. त्याने आपल्या 'हृदयांतला श्रीकृष्णभक्तीचा सारा जिव्हाळा त्यांत ओतला आहे. तो तिथल्या वृक्षादिकांचे वृक्ष-वल्लरी म्हणून वर्णन करीतच नाही. त्याची आत्मपरता त्याला तिथल्या वस्तूंकडे तिऱ्हाईतपणाने पाहूंच देत नाही. ते वृक्ष नसून नरींद्राच्या उत्कटभावनेच्या अभिव्यक्तीचें तें एक माध्यम आहे. नरींद्राच्या आत्मपरतेने त्या वृक्षादिकांत प्रवेश करून त्यांना जिवंत केलें आहे व वृक्षादिकांनीहि, आपली मूळ जडावस्था सोडून, नरींद्राच्या व्यक्तित्वांत शिरून तिथली आत्मपरता आत्मसात् केली आहे. नरींद्राच्या आत्मपरतेची ही तीव्रता वनोपवनांच्या वर्णनांत कुठेहि ओसरलेली नाही.

—आणि म्हणूनच, नरींद्राने केलेल्या वनोपवनांच्या वर्णनांत भावनेची उत्कटता आहे, कल्पनेची गरुड-भरारी आहे, प्रज्ञेचे नवनवोन्मेष आहेत, भाव-प्रतिमांचें अभिजातत्व आहे, शब्दसौष्ठवाचें माधुर्य आहे, त्याच्या वर्णनांच्या उभारणींत महाकवीची ऐट आहे आणि साऱ्यांत महत्त्वाचें म्हणजे त्याने आपलें सारें हृदय त्यांत ओतलें आहे. विशाल प्रवाशावर लाटांचा भव्य व मनोहर खेळ चालावा तसा नरींद्राच्या प्रतिभेचा विशाल प्रवाह खळखळतांना दिसतो. त्याच्या स्फुरणशील प्रतिभेच्या प्रकर्षाने वाचक जसे वेडावून जातात, त्यांच्या हृदयांतल्या भाव-सागराला जशी भरती येते आणि ते त्या वातावरणांतच जसे रमत राहतात—तसें प्रस्तुत कवीचें वृंदावन-वर्णन वाचून होत नाही. गरुडाची भरारी आणि फुलपाखरांचें नर्तन यांत जो फरक, तोच फरक नरींद्र आणि प्रस्तुत कवि यांच्या प्रतिभेंतहि !

**श्रीमूर्ति-वर्णन**

२१८ ते २४५ या ओव्यांत कवीनें श्रीकृष्णाचें मूर्तिवर्णन केलें आहे. मूळ भागवतांतल्या एका श्लोकाचा [ १३-११ ] कवीने येथे २७ ओव्यांत विस्तार केला आहे. श्रीकृष्ण-

गुणानुवादासाठी लिहिण्यांत आलेल्या प्रस्तुत काव्यांत श्रीमूर्ति-वर्णन करतांना कवीची आपल्या आराध्यदैवताशीं अगदी एकतानता झाली असली पाहिजे व त्याच्या आत्मपरतेचे सारे आत्मीय गुणविशेष येथे व्यक्त झाले असले पाहिजेत अशीच कुणाचीहि अपेक्षा राहील

श्रीमूर्तिवर्णनावरून कवीच्या प्रतिभेचें मूल्यमापन करावयाचें झालें तर त्याची प्रतिभा संयत स्वरूपाची आहे व तिचें वातावरण प्रायः पवित्र आहे असें म्हणावें लागेल.

' सुनिले गगनि विस्फुरत । जैसी कां विद्युलता
तैसा फुटा असे मिरवत । खांदावरि ' ( २३३ )

या ओवींतल्या उपमेने ' श्रीकृष्णाची मेघसदृश सुनील अंगकान्ति व त्याच्या खांद्यावर मिरविणाऱ्या उत्तरीयाचा तेजस्वी रंग ' कवीने मोठ्या खुबीने ध्वनित केला आहे.

' कवण श्रीमुखाचें वरश्रेपण । कैसे सदोदित सुप्रसन्न
तेयाचें इंदु लाहाता पाईकेपण । तरि कलंकिया न्हवता ' ( २३५ )

' श्रीकृष्णाच्या मुखाचं सदा-प्रफुल्ल सौंदर्य काय वानावं ? चंद्रानं तें सौंदर्य पाहण्याची नुसती इच्छा जरी केली असती तरी तो कलंकित झाला नसता. '

या ओवींत प्रतीपालंकाराने श्रीमुखाच्या रमणीयतेचें दर्शन तर घडविलें आहेच, पण चंद्राच्या कलंकावर त्याने केलेली कल्पनाहि अत्यंत हृद्य आहे. चंद्राच्या कलंकावर आजवर अनेक कवींनी कल्पना केल्या असतील, पण श्रीकृष्णभक्तींतून आविर्भूत झालेली अभिनव कल्पना म्हणून प्रस्तुत ओवीचाच निर्देश केला पाहिजे.

—पण, वरीलसारख्या उदाहरणांत कवीच्या प्रतिभेचें विद्युत्स्फुरण दिसत असलें तरी श्रीमूर्तीच्या एकंदर वर्णनांत मात्र कवीच्या आत्मपरतेची उत्कटता प्रत्ययाला येत नाही. श्रीकृष्णाचें गृहीतश्रेष्ठत्व व त्याच्या शरीरावयवांचें गृहीत अद्वितीयत्व यांच्या वस्तुनिष्ठ वर्णनांतच कवि येथे रमला आहे. श्रीमूर्तिवर्णन करतांना त्याने श्रीमूर्तीचा उचित असा क्रम साधल्यामुळे व त्याच्या नेटक्या वर्णनशैलीमुळे या वर्णनांत रुचिरता आली आहे, हा भाग वेगळा. आत्मपरतेच्या विलासापेक्षा वर्णनाचा नेटकेपणा हेंच श्रीमूर्ति-वर्णनाचें वैशिष्ट्य.

## यमुना–वर्णन

प्रस्तुत काव्यांत कवीची आत्मपरता सर्वांत अधिक प्रमाणांत कुठे प्रत्ययाला येत असेल तर ती त्याने केलेल्या यमुना-वर्णनांत. १६७ ते १९७ या ३० ओव्यांत कवीने यमुना-वर्णन केलें आहे. श्रीकृष्णाच्या साहचर्याने यमुनाजलासारख्या जड वस्तूंतहि कशी सरूपता संचरत असे याचें प्रतिपादन करणें हा कवीचा यमुनावर्णनांत प्रमुख उद्देश असला तरी त्यांतूनच—म्हणजे यमुनेसारख्या जड वस्तूलाहि भावात्मक करणाऱ्या त्याच्या प्रतिभेंतूनच—त्याच्या आत्मपरतेचा विलासहि दृष्टीस पडतो.

' यमुनेचं पाणी मुळांत स्वच्छ होतं; पण श्रीकृष्णाची सावळी कान्ति तिच्यात प्रतिबिंबित झाल्यामुळे ती जी निळी झाली, ती कायमचीच ' ( १६८ ) अशी प्रस्तावना करून कवि सांगतो—

' देखौनि श्रीचक्रपाणि । कैसी सभ्रमीत जालि तरंगीणि
कि आनंदली अंतःछ्रणि । रोमांच दाटले
की आलंगावेया श्रीकृष्णु राजा । दिया बहुति केलिया भुजा
तैसे तरंग पढियासले भज । कालींद्रियेचे ' ( १७०, १७१ )

' कि जन्मली देवांचा चराणिं । तें उतवलपण असे मनि
म्हणौनि भेटों आली मंदाकिनी । कालिंदि न्हवे
कि श्रीकृष्णाचिया संगति । आंमचि फिटैल अधोगति
म्हणौनि भेटों आलि भोगावति । पातालौनि ' ( १७३, १७४ )

' श्रीकृष्णाला पाहून यमुना नदी जणू आनंदानं हेलावली होती. तिच्या पाण्यावर उठणारे तरंग—श्रीकृष्णदर्शनानं तिच्या हृदयांत उचंबळणाऱ्या आनंद-लहरींनी तिच्या शरीरावर दाटलेले रोमांच होते ते !—की श्रीकृष्णाला आलिंगन देण्याकरिता आपल्या तरंगांच्या रूपानं अनंत भुजा सरसावून ती पुढे आली होती ?—किंवा असं असेल की श्रीकृष्णाच्या चरणापासून निर्माण झालेली गंगा आपल्या पित्याला भेटायला फार उत्सुक झाली असेल; आणि त्या उत्सुकतेनं गंगाच पित्याला भेटायला इथं आली असेल.—ही कालिंदी नव्हेच ! किंवा गंगेला असंहि वाटत असेल की, स्वर्गातून निघाल्यापासून आपली एकसारखी अधोगति चालली आहे. श्रीकृष्णाच्या सहवासानं तरी आपली अधोगति कायमची फिटेल. म्हणून, पाताळीची भोगावतीच जणू श्रीकृष्णाला भेटायला ( यमुनेच्या रूपानं ) इथे आली होती !— '

कवि येथे यमुनेचें वर्णन करीत नाही; स्वतःच्या हृदयांतल्या भाव-तरंगांचें दर्शन घडवीत आहे. यमुना आणि कवीची भावना येथे इतकी एकरूप झाली आहेत की, आपण यमुनेचं वर्णन वाचीत नसून कवीच्या व्यक्तित्वांत शिरून यमुनेनं जें भाव-रूप प्राप्त केलं होतं तेंच प्रत्यक्ष पाहत आहोंत. आत्मपरता—स्वतःच्या आत्म्यांतच यमुनेचं रूप पाहण्याची ही प्रवृत्ति—यामुळेच हें वर्णन इतकें जिवन्त व प्रत्ययोत्पादक झालें आहे. यमुना आणि आपल्या हृदयांतली श्रीकृष्णभक्तीची भावना यांत कवीला भेदच दिसत नाही. आपल्या हृदयांतली भावनाच यमुना-तरंगांच्या माध्यमांतून त्याने व्यक्त केली आहे.

कवीने केलेल्या यमुना-तरंगांच्या वर्णनांतून त्याने आपल्या हृदयाचें दर्शन घडविलें आहे—हृदयाचें, म्हणजे त्याच्या हृदयांत शिरून भावरूप झालेल्या यमुना-तरंगांचें. त्याच्या डोळ्यापुढे यमुना उभी राहिली; केवळ कल्पनाचक्षूंसमोरच ती उभी राहिली असें नव्हे, त्याच्या हृदयांत तिने प्रवेश केला व तिथल्या मूळच्या भावना-प्रकर्षाने यमुनेचें भाव-रूप झाल्यानंतर कवीच्या हृदयांतली श्रीकृष्णप्रेमत्वाची भावना, कल्पकतेचा साज-शृंगार लेऊन, यमुना-प्रवाहाच्या तरंगांतून येथे अवतरली.

पण पुढेपुढे कवीच्या आत्मपरतेची तीव्रता ओसरल्यामुळे ब्रह्मचारी, वानप्रस्थ, अघमर्षणी-इत्यादिकांचीं त्याने केलेलीं वर्णनें रूक्ष झालीं आहेत. तीं तटस्थवृत्तीने एखाद्या त्रयस्थाने केलेल्या वर्णनांसारखीं वाटतात.

## आत्मपरतेचा विलास

प्रस्तुत काव्यांतल्या वरील मुख्य वर्णनप्रसंगांशिवाय इतरहि कांही ठिकाणीं कवि इतरांच्या भावनांशीं समरस झाला आहे. त्याहि प्रसंगांतून त्याच्या आत्मपरतेचें नित्युस्फुरण, व त्याबरोबरच तिची क्षीणताहि, व्यक्त होते.

अघासुराने सर्प-रूप धारण केलें होतें. तें पाहून बाळगोपाळांना वाटलें की तो सर्पाकृति पर्वतच आहे ! त्या वेळीं आपल्या बालस्वभावानुसार त्यांनी जे वार्तालाप केले [ ९५, ९६ ] ते सांगायला कवीने प्रारंभ केला न केला तोंच त्याने तत्त्वज्ञानांत प्रवेश केला. कवि, स्वतः लहान होऊन, लहान मुलांच्याहि मनोभूमिकेशीं समरस होऊं शकतो हें जसें यांतून व्यक्त होतें,

तसेंच त्याची ज्ञानात्मक मनोवृत्ति त्याच्या आत्मपरतेला लगेच पायबंद घालते हेंहि त्यावरून स्पष्ट होतें. या ठिकाणीं दुसरा प्रतिभाशाली कवि असता तर त्याने बालकांच्या वार्तालापाशीं समरस होऊन तो अधिक जिवंत व परिणामकारक केला असता. श्रीधराने नाही का 'हरि-विजयां'त या प्रसंगाचें वर्णन भावनात्मकतेने–लहान मुलांच्या मनोवृत्तीशीं तन्मय होऊन केलें ?

३१६ ते ३३२ या १६ ओव्यांत श्रीकृष्णाचा वेणुध्वनि ऐकतांच त्या नादाने व वत्सरूपी श्रीकृष्णाच्या वेधाने गाईची कशी अनावर स्थिति झाली होती याचें भावनोत्कट वर्णन कवीने केलें आहे. गाईच्या रूपाने कवीची भावनाच जणू श्रीकृष्णदर्शनाकरिता अधीर होऊन वेगाने उड्या मारीत निघाली आहे असें वाटतें. कवीने जरी तिऱ्हाइताच्या तटस्थ-पणानेच या वर्णनाची उभारणी केली असली, तरी मधूनच गाईच्या मातृहृदयाशीं तो समरस होतो. पुत्रवात्सल्याने वत्सांकडे 'धंवाळणाऱ्या' धेनूंचें चित्र त्याने चित्रकाराच्या भावना-त्मकतेने व कलात्मकतेने रेखाटलें आहे. मध्येच त्याची आत्मपरता इतकी तीव्र होते की, तो सारा देखावा त्याच्या डोळ्यांसमोर प्रत्यक्ष नाचूं लागतो; आणि तो म्हणतो—

'वरौनि उतरतां गोवर्धना । कैसीया धेनु पढियासलिया मना
किं अंतरालौनि देवांगना । एत श्रीकृष्णवेधें' (३२४)

'गाई ? छे: ! श्रीकृष्णाच्या वेधशक्तीनं आकाशांतून उधळलेल्या देवांगनाच होत्या त्या !'

कधी कधी कवीची भावना इतकी कळसाला पोचते की श्रीकृष्ण आपल्यासमोर प्रत्यक्ष उभाच आहे असा त्याला भास होतो—

'यजितां अनेगि अध्वरीं । न रिगसि दिक्षितांचां घरीं
कां लोलसि गौळियांचां दारीं । श्रीकृष्णा तें तुं जाणसि' (३०१)

या शब्दांत तो श्रीकृष्णाशीं संवादहि करूं लागतो.

'तेव्हलि मज गमले ऐसें—' [३६६] 'त्यावेळीं मला असें वाटलें, की—' असें म्हणण्यांतहि कवीची भावनोत्कटताच व्यक्त होते. ब्रह्मदेवाचें भूलोकीं आगमन, श्रीकृष्णाप्रमाणे चतुर्भुज, शंखचक्रादि आयुधांनी व त्याच्या अंगावरल्या वैजयंतीसारख्या रत्नालंकारांनी युक्त असा–प्रत्येक गोपाळ, त्या प्रत्येकाजवळ असलेला एकेक ब्रह्मदेव–आणि हें सारें पाहून ब्रह्मदेवाची झालेली संभ्रान्त अवस्था कवीने समरसतेने चित्रित केली आहे. श्रीकृष्णाच्या सामर्थ्याबद्दल ब्रह्मदेवाच्या मनांत निर्माण झालेले विचार-तरंगहि [३५०-३५२] भावस्पर्शी आहेत.

**कवीच्या आत्मपरतेचें स्वरूप**

वरील प्रसंगांतून कवीच्या आत्मपरतेची कल्पना येऊं शकेल; आणि आपल्याला असें म्हणावें लागेल की, कवीच्या प्रतिभेंत आत्मपरतेचें विद्युत्स्फुरण जसें आहे, तशीच, नव्हे त्यापेक्षाहि अधिक, तिची क्षीणताहि आहे. मधूनच, ज्या वस्तूचें वर्णन करावयाचें असतें तिच्याशीं तो समरस होतो; ती वस्तूहि, आपली मूळची जडावस्था सोडून, कवि-हृदयांत भावरूप धारण करते. पण कवि-वस्तूची ही समरसता फार वेळ टिकत नाहीं. त्यामुळे वाचकांच्या भावनेला तो आवाहन करतो न करतो तोंच तत्त्वज्ञानाच्या वस्तुनिष्ठेने त्या भावनात्मकतेला पायबंदहि घालतो. त्यामुळें कोणत्याच–ज्या भक्तीबद्दल कवीला इतकी प्रीति आहे त्या-भक्तिरसाचाहि विमुक्त विलास प्रस्तुत काव्यांत नाही. 'यमुना-वर्णन' सोडलें तर या काव्यांतील प्रायः एकहि दृश्य आपल्या मनांत चित्रित नाही. तुकारामाचें भक्ति-काव्य वाचून अंतःकरणांतल्या भाव-लहरी जशा उचंबळतात तसा प्रत्यय प्रस्तुत काव्य वाचून येत नाहीं.

ब्रह्मदेवाने केलेल्या श्रीकृष्णाच्या स्तुतीपासून तर प्रस्तुत काव्य तत्त्वज्ञानांत पूर्णपणें प्रवेश करतें. नंतर रूक्ष तत्त्वज्ञान आहे, उपदेश आहे-अर्थात् वस्तुनिष्ठा आहे. पण या वस्तुनिष्ठेला भावरूप करण्याचें सामर्थ्य मात्र कवीच्या आत्मपरतेंत नाही. उपदेश तर तुकारामाच्याहि अभंगांत भरपूर आहे; पण तरी, त्याचा उपदेशहि काव्यदृष्टीने प्रतीकारक वाटतो. कारण त्यांत केवळ ज्ञान व्यक्त झालें नसून तुकारामाचे अध्यात्मानुभव व्यक्त झालेले आहेत. त्यांत विचार नसून विचारानुभूति आहे. ज्ञानाच्या वस्तुनिष्ठेलाहि तुकारामाच्या उत्कट अनुभूतीने भावनात्मक बनविलें आहे. ज्ञानदेवांच्या भावार्थदीपिकेचें उदाहरण तर या बाबतींत अग्रगण्य ठरेल. प्रस्तुत कवीचें तसें झालेलें नाही. त्यांत तत्त्वज्ञान, केवळ अध्यात्म-विचारच मांडलेले आहेत. त्या तत्त्वज्ञानांत त्याच्या अनुभूतीचा जिव्हाळा नाही, आणि त्यामुळे त्या विचारांत भावनात्मकताहि नाही.

### वस्तुवर्णन की आत्मदर्शन ?

वर्णनशैली हा प्रस्तुत कवीचा एक विशेष आहे. कथा-काव्यांत वर्णनशैलीला फार महत्त्व असतें. ' कौशल्य सारें रचनेंत आहे । सत्काव्य तेंगें नव वाटताहे ' या म्हणण्यांतहि हाच भावार्थ असावा. आपली कथा वाचकांना रुचिर वाटेल अशा रीतीने सांगण्याचें कौशल्य कवीच्या ठिकाणीं असेल तरच तें काव्य वाचकांच्या मनाची पकड घेऊं शकतें.

पण वर्णनशैलीलाहि आत्मपरतेनेच जिवन्तपणा येतो ना ? आत्मपरता नसतांना केवळ वर्णनशैलीने काव्य जिवन्त कसें होऊं शकेल ? आणि म्हणूनच, मनांत असा विचार येतो की, वस्तुवर्णनें हाच एखाद्या कवीचा विशेष आहे असें जेव्हा आवर्जून सांगण्यांत येतें, तेव्हा त्यांत भावनात्मकता किंवा आत्मपरता कमी असते हा विचार अंगभूतच असतो का ?—कारण, भाषा ही आपले विचार जितक्या निःसंदिग्धपणें व अविकृतपणें व्यक्त करूं शकते तितक्या निःसंदिग्धपणें व अविकृतपणें ती आपल्या भावना व्यक्त करूं शकत नाही. भाषा हें विचार-भावनांचें वाहन. पण ती आपल्या मनांतले विचार जितक्या यथार्थतेने व्यक्त करूं शकते तितक्या सर्वार्थांनी ती आपल्या भावनांचें ' दर्शन ' घडवूं शकत नाही. मनांतल्या भावनांचें दर्शन घडविण्याला शब्द अपुरे असतात. ' **जें अनुभवें जाणिजे । ते बोलीं केवि वानिजे** ' या चरणांत [ १० ] प्रस्तुत कवीने हाच अर्थ व्यक्त केला आहे.

अर्थात्, कवीनें जर वर्णनांवरच भर दिला तर त्याच्या भावनेचा सुगंध बऱ्याच प्रमाणांत कमी झाल्यावाचून राहावयाचा नाही. त्यांतली आत्मपरतेची उत्कटता वर्णनांच्या फापटपसाऱ्यांत क्षीण होऊन जाईल.

आणि काव्यांत **वर्णन** करावयाचें असतें का ?—आणि तें कशाचें ?—मनांतल्या भावनांचें ?—मनांतल्या भावनांचें **वर्णन** करावयाचें नसतें, **दर्शन** घडवावयाचें असतें. कवीला जी उत्कट अनुभूति–मग ती भावनांची असो की विचारांची असो व्यक्त करावयाची असते. त्या अनुभूतीचें भावनात्मक दर्शन त्याने वाचकांना घडविलें पाहिजे. आई आपल्या ' मुलाचें ' वर्णन करूं शकेल; पण त्याच्याविषयींच्या ' जिव्हाळ्याचें ' तिला ' वर्णन ' करतां येईल का ?–प्रेयसी आपल्या प्रियकराविषयींच्या भावनेचें ' वर्णन ' नाही करूं शकत. शब्दांच्या माध्यमांतून आत्मदर्शन घडवीत असते ती.

आणि म्हणूनच, वस्तुवर्णनें हाच एखाद्या कवीचा विशेष आहे असें जेव्हा आवर्जून सांगण्यांत येतें तेव्हा त्यांत भावात्मकता किंवा आत्मपरता कमी असते हा विचार अंगभूतच असतो असें म्हणावें लागेल.

—प्रस्तुत कवीच्या बाबतींतहि तें खरें आहे.

**व्यक्तिरेखाटन : दुबळा ब्रह्मदेव**

श्रीकृष्णाच्या व गोपाळांच्या गोपाळकाल्यांत भाग घेण्याची व श्रीकृष्णाचें सान्निध्यसुख अनुभविण्याची देवांचीहि इच्छा होती; पण त्यांच्या ' देवपणा 'मुळे त्यांना तसें करतां येईना. शेवटीं निराश होऊन ते म्हणत—

' उसिटें लाहावेयाचे सायास । तेथ सेवेची कवणि आस
एथ रिगों न ये आपैसा । एयाचिया कृपाविण ' ( २५३ )

' श्रीकृष्णाचें उष्टें अन्न मिळवायलासुद्धा येथे आपल्याला इतके प्रयास पडतात तेथे त्याच्या सेवेची आशा कशी करावयाची ? म्हणून, त्याच्या कृपेवाचून या गोपाळांच्या गोपाळ-काल्यांत आपण होऊन न शिरणं बरं ! '

...अशा प्रकारें श्रीकृष्णाने देवांनाहि ' भुलविलें ' हें ' सृष्टि-कर्त्या ' ब्रह्मदेवाला सहन झालें नाही. त्याने श्रीकृष्णाची परीक्षा पाहण्याचें टरविलें. जो परीक्षा पाहतो तो स्वतःला सर्वज्ञ व ज्याची परीक्षा पाहावयाची त्याला स्वतःच्या मानाने अज्ञानी समजत असतो. पण, ब्रह्मदेव जर स्वतःला श्रीकृष्णापेक्षा श्रेष्ठ समजत होता तर त्याने श्रीकृष्णाला न कळत त्याच्या वासरांची व गोपाळांची चोरी [ २५७ ] कां केली ? उघडउघड, श्रीकृष्णाच्या समोरासमोर, त्याने त्यांचें हरण कां केलें नाही ?

त्यानंतर एक वर्षभर ब्रह्मदेवाला श्रीकृष्णाची परीक्षा पाहण्याची आठवणच झाली नाही. त्याला आपण केलेल्या वत्स-गोपाळांच्या अपहरणाचा विसर पडला होता असें ' से जाली मनीं । चतुरानना ' [ ३४५ ] या चरणावरून दिसतें. एक तर ज्याने देवांनाहि भुलविलें त्या श्रीकृष्णाची परीक्षा पाहण्याची आठवणहि ब्रह्मदेवाला झाली नाही हें त्याच्या अहंकाराला शोभणारें नाही; आणि दुसरें असें की, एका क्षणापूर्वी केलेल्या कृत्याचा परिणाम पाहण्याला दुसऱ्याच क्षणीं जो उद्युक्त होतो, त्याला एका क्षणांतच आपण केलेल्या कृत्याचा विसर पडला असें कसें म्हणतां येईल ?—

' सींहांचें बल विसरला । जैसा गजु मदा चाढिनला
तैसें असासित बोलों लागला । चतुराननु ' ( ३४९ )

या ओवींत मदोन्मत्त ब्रह्मदेवाचें चें व्यक्तिचित्र कवीने रेखाटलें आहे तें जिवन्त नाही असें कोण म्हणेल ?

पण, आपण श्रीकृष्णापेक्षा श्रेष्ठ आहोंतच अशी ब्रह्मदेवाची खात्री नव्हती तर त्याने श्रीकृष्णाची परीक्षा पाहण्याचें कां योजिलें ? आणि ' जैसा गजु मदा चढिनला ' तसा ' असासित बोलों लागण्या 'चं तरी मग ' चतुरानना 'ला काय कारण होतं ?—जो परमेश्वर स्वतंत्र प्रपंच, नवी सृष्टि निर्माण करूं शकतो अशी ब्रह्मदेवाला आशंका होती [ ३५२ ], त्याची परीक्षा पाहण्याची तरी कल्पना ब्रह्मदेवाच्या मनांत कशी आली ?

ब्रह्मदेवाला सत्यलोकांतून मर्त्यलोकांत यायला असा किती वेळ लागला असेल ? मृत्युलोकांतलें एक वर्ष म्हणजे ज्याचा एक क्षण आहे [ ३४६ ], त्याला येथे यायला तर एक निमिषहि लागला नसेल. पण तेवढ्या वेळांतसुद्धा आपण लपवून ठेवलेले वत्स-गोपाळ श्रीकृष्णाने सत्यलोकांतून परत आणले असतील अशी आशंका ब्रह्मदेवाला आली. ' सर्वज्ञनाथा ' ची परीक्षा पाहण्याकरितां कवीने निर्माण केलेला ब्रह्मदेव तेजस्वी नाही, त्याच्या विचारांत सुसंगति नाही व स्वतःच्या सामर्थ्यावर त्याचा विश्वासहि नाही,

श्रीकृष्णाचें सामर्थ्य पाहतांच ब्रह्मदेव भ्रांतचित्त होतो व लगेच आपला सारा अहंकार सोडून 'आतां शरण आला दातारा...सकळै उपसाहावे' [ ३९५ ] अशी तो श्रीकृष्णाची सपशेल शरणागति स्वीकारतो.

या साऱ्या प्रसंगांतून कवीची श्रीकृष्णश्रेष्ठत्वाची भावना व्यक्त होत असली तरी कलात्मक दृष्ट्या हा समरप्रसंग आकर्षक वाटत नाही. समर हा अभिनिवेशाशिवाय शक्यच नाही. पण कवीने निर्माण केलेल्या ब्रह्मदेवांत अभिनिवेशच नाही; तो दुबळा आहे. श्रीकृष्णाच्या तुलनेनं क्षीणशक्ति आहे. त्यामुळे या समरप्रसंगांत नाट्य नाही. समरप्रसंगांतली भयचकितता व्यक्त होण्याकरिता दोनहि बाजूंचें चित्रण सारख्याच तोलाचें व्हावें लागतें.

कवीनें आपल्या कल्पनेची भर घालून, ब्रह्मदेव हाहि समर्थ होता, त्याचें व श्रीकृष्णाचें वाग्युद्ध झालें व शेवटीं श्रीकृष्णपरमात्म्याच्या अद्वितीयत्वाची खात्री पटल्यामुळे त्याने श्रीकृष्णाची शरणागति स्वीकारली असें दाखविलें असतें, तर प्रस्तुत प्रसंग कलादृष्ट्या अधिक रमणीय झाला असता. कवीची प्रतिभा नवनिर्माणक्षम असती तर त्याने मूळ भागवतांत नसलेला पण स्वतःच्या प्रतिभेने निर्मिलेला असा स्वतंत्र प्रसंग येथे योजून काव्य कलात्म व रमणीय केलें असतें. नरींद्राने नाही का रुक्मिणीची पत्रिका स्वतंत्र निर्माण करून आपल्या प्रतिभेचा विलास दाखविला ? कवीने ब्रह्मदेव हा जर बलवन्त दाखविला असता तर त्याला पराभूत करणाऱ्या श्रीकृष्णाचें श्रेष्ठत्व त्यांतून अधिक परिणामकारकतेने व्यक्त झालें असतें. कारण, शत्रु जितका प्रभावी त्यापेक्षाहि त्याला हरविणाऱ्या व्यक्तीचें श्रेष्ठत्व अधिक प्रभावी ठरत असतें. पण हें समर कलात्मक होण्याकरितां शत्रु हाहि प्रभावी दाखवावा लागतो, बलवन्त दाखवावा लागतो.

## कवीची कल्पनासृष्टि

कवीच्या आत्मपरतेचें स्वरूप कळण्यासाठी त्याच्या कल्पनासृष्टीचा मागोवा घेणें आवश्यक आहे. ४४३ ते ४५२ या १० ओव्यांत संसारवनाचें आध्यात्मिक रूपक आहे. या रूपकांत आध्यात्मिकता व काव्य यांचा संगम असला तरी आत्मपरतेंतून हें रूपक स्फुरलें नसूनं अध्यात्मांतून त्याची निर्मिति झाली आहे. या काव्यांतल्या बहुतेक सर्व कल्पना श्रीकृष्णश्रेष्ठत्वाच्या भावनेंतून व अध्यात्मांतूनच प्रस्फूर्त झाल्या आहेत.* किंबहुना, तें या काव्याचें वैशिष्ट्य आहे असें म्हटलें पाहिजे. यमुना-वर्णन व वृंदावन-वर्णन यांतल्या कांही कल्पना सोडल्या तर केवळ आत्मपरतेंतून स्फुरलेल्या कल्पना या काव्यांत फार थोड्या आहेत. तत्त्वज्ञानाचा भाग जेव्हा जेव्हा येतो तेव्हा तेव्हा कवीच्या शब्दांना नेटकें रूप प्राप्त होतें, त्याला निरनिराळ्या कल्पना सुचतात, सविस्तर रूपक सुचतें. पण या सर्व कल्पना आध्यात्मिकतेच्या रंगांत बुडून निघालेल्या असल्यामुळे त्यांतून आधी तत्त्वज्ञान व नंतर कल्पकता व्यक्त होते. उदाहरणार्थ—

> 'दिवें ॐ वालिजे दिनकरु । क्षिराब्धी दुधाचा पाहुणरु
> तैसा तुज पुढां मतिचा विस्तारु । आइकें सर्वज्ञनाथा' ( ४०८ )

* याहि ओव्या पाहाव्या—११–१२, २६, २७, २९, ३०, ३८, ३९, १०७, ११८, १८२, १८५, २१४, २१५, २२२, २२६, २२७, २२८, २७६, ३२०, ३२१, ३२३, ३२८, ३७९, ३८७, ४०८, ४०९, ४१९, ४२२.

अनुक्रमणिका

हीच ओवी पाहा. तिच्यांतली कल्पना हृद्य आहे, पण ती ' तेवा तुज पुढां मतिचा विस्तारु। आइकैं सर्वज्ञनाथा ' या श्रीकृष्णश्रेष्ठत्वाच्या मुखींच्या प्रवचनाकरिता अवतरली आहे.

काव्यावरून कवीच्या अंतरंगाचा शोध घ्यावयाचा असेल तर प्रस्तुत कवि हा संत-प्रवृत्तीचा होता असें म्हणावें लागेल. आपलें कवित्व त्यानें संत-प्रवृत्तीकरिता राबविलें आहे. त्याचें हृदय पवित्र होतें, त्याची तात्त्विक धर्मश्रद्धा जाज्वल्य होती आणि त्याच्या प्रतिभेचें स्वरूप संयत होतें.

कवीच्या प्रतिभेबद्दल असं विधान करायला हरकत नाही की, त्याची प्रतिभा ही दुय्यम दर्जाच्या कवीची होती. शांत रसाचा प्रसंग वर्ण्यविषय असूनहि आपल्या ' भावार्थ दीपिकें'त ' साहित्यसोनियाच्या खाणी ' निर्माण करणाऱ्या ज्ञानदेवांच्या, ' विषयां होईल माजवण ' असें रुक्मिणीचें वर्णन करणाऱ्या नरींद्राच्या किंवा ' साहित्याचेनि परिमळे। शृंगाराचेनि मेळें। प्रबंधें होति मातावळे । कवीजनांचे ' ( शिशु० १५ ) असें म्हणणाऱ्या भास्कराच्या प्रतिभेची तो बरोबरी करूं शकत नाही. शारदेच्या मंदिरांत पहिल्या मानकऱ्यांची जागा ज्ञानदेव, नरींद्र, भास्कर यांना मिळेल. भावनेचा प्रकर्ष किंवा कल्पकतेची भरारी या दोनहि दृष्टींनी प्रस्तुत कवि, आत्मपरतेच्या विद्युत्स्फुरणानें आपलें काव्य क्षणभर उजळून टाकण्याचें सामर्थ्य त्याच्यांत असलें तरी, शारदेच्या मंदिरांतल्या मानकऱ्यांच्या अग्रमालिकेंत बसूं शकत नाही. ● ● ●

---

## एक नम्र विनंती

रे. नारायण वामन टिळक यांना कवि म्हणून महाराष्ट्र ओळखतो. त्यांच्या गद्य लिखाणाची जाणीव अगर आठवण मात्र फार थोड्यांना असेल. त्यांचें चरित्र व समग्र वाङ्मय यांचें संशोधन करण्याचा प्रयत्न मीं गेल्या दोन वर्षांपासून चालविला आहे. आजपर्यंत त्यांचीं सुमारें २५ पुस्तकें मला मिळालेलीं आहेत. पुढे दिलेलीं पांच पुस्तकें त्यांनी लिहिलेलीं आहेत असें कळतें. तीं प्रत्यक्ष पाहायला मिळालेलीं नाहीत. त्यांबाबत जर कुणाला कांही माहिती असेल तर त्यांनी कृपा करून मला लिहावें.

१. हरिदासांकरितां चुटके ( पद्यें ) प्रकाशक ( ? ) सन ( ? )
२. मूर्तिपूजा करणें हें पाप नव्हे. प्र. ( ? ) सन १८८५ ( ? )
३. हिंदु लोकांच्या धर्मकार्यांत सरकार नको. ले. टिळक व नारायण भास्कर रानडे प्र. ( ? ) सन १८८५ ( ? )
४. गोरक्षा ( पद्यें ) प्र. नागपूर गोरक्षण संस्था सन १८९२ ( ? )
५. राधा-गुरु-मान-लीला ( हिंदी पदें ) प्र. ( ? ) सन ( ? )

याशिवाय, टिळकांच्या इतर लेखनाबाबत व चरित्राबाबत माझ्याशीं पत्रव्यवहार करून कोणीं मला साहाय्य व मार्गदर्शन केल्यास फार आभारी होईन. ह्या कामाचें महत्त्व लक्षांत घेऊन माहीतगारांनी शक्यतों हातभार लावावा ही विनंती.

माझा पत्ता :—
प्रा. अशोक दे. टिळक,
अहमदनगर कॉलेज,
अहमदनगर.

अशोक देवदत्त टिळक

# साहित्य-समीक्षा

## नाट्य व रंगभूमि

प्रा. वनहट्टी हे १९२० नंतर उदयाला आलेल्या लेखकांच्या पिढींतले एक व्यासंगी, रसिक व चतुरस्र साहित्यिक आहेत. गेली तीन तपें, नाट्य, रंगभूमि, साहित्य आणि समाजजीवन इत्यादिकांचे विमर्शक आणि विवेचक म्हणून ते मराठी रसिकांना परिचित आहेत. त्यांच्या विविध स्फुट लिखाणांचें वर्गीकरण करून तें खंडशः प्रकाशित करण्याचें त्यांच्या कांहीं प्रमुख शिष्यांनी ठरविलें ही फार चांगली गोष्ट झाली. टीकात्मक किंवा समीक्षणात्मक स्वरूपाचें लेखन प्रथम नियतकालिकांतून प्रसिद्ध व्हावें हें स्वाभाविकच आहे. पण मासिकांत येणाऱ्या सामान्य कथांचे संग्रह ज्या प्रमाणांत प्रसिद्ध होतात, त्या प्रमाणांत टीकात्मक लेखनांतला निवडक भागसुद्धा अजून आपल्याकडे ग्रंथनिविष्ट होत नाही. त्यामुळे साहित्याच्या अभ्यासकांचा तर तोटा होतोच, पण त्यापेक्षाहि मनाला अधिक खटकणारी गोष्ट म्हणजे एक पिढी गाजवून गेलेल्या टीकाकारांच्या मतांचा आणि शैलीचा दुसऱ्या पिढीला मागमूससुद्धा उरत नाही ! उदाहरणच द्यायचें तर तें कै. बाळकृष्ण अनंत भिडे यांचें देतां येईल. 'माधव जूलियन'ना उद्देशून भिड्यांनी वापरलेला 'प्रणय-पंढरीचा वारकरी' हा शब्दप्रयोग आजच्या बी. ए. च्या विद्यार्थ्याला पाठ असेल; पण भिड्यांच्या निःस्पृह आणि तिखट टीकालेखनांतलें अक्षराक्षरहि त्याने वाचलेलें नसतें. म्हणूनच प्रा. वनहट्टींच्या सर्व लिखाणांचें संपादन करून तें खंडशः प्रकाशित करण्याचें ठरविल्याबद्दल डॉ. कोलते, डॉ. मा. गो. देशमुख, प्रा. द. रा. गोमकाळे वगैरे त्यांच्या शिष्यांना मी मनःपूर्वक धन्यवाद देतों.

'नाट्य व रंगभूमि' हा वनहट्टींच्या अशा रीतीने संकलित होणाऱ्या लेखांचा दुसरा खंड आहे. या २०० पृष्ठांच्या लेखसंग्रहांत विविध प्रकारचे बारा नाट्यविषयक लेख, भाषणें, प्रस्तावना, नाट्यचर्चा, नाटकचर्चा इत्यादि समाविष्ट केले आहेत. त्यांतले बहुतेक वाचनीय वाटतात; याचें कारण वनहट्टी केवळ एक विद्वान् प्राध्यापक म्हणून या विषयांचा परामर्श घेत नाहीत. त्यांच्या रक्तांतच नाट्यप्रेम आहे. (मिरजेशीं निकट संबंध आल्यामुळे तें निर्माण झालें असेल काय ?) मराठी रंगभूमीचा वैभवशाली काळ त्यांनी पाहिला आहे, अभ्यासिला आहे. तिच्या अपकर्षाच्या काळांतहि आपल्या परीने त्यांनी तिची सेवा करण्याचा प्रयत्नहि सतत सुरू ठेवला आहे. स्वतः नट किंवा नाटककार नसल्यामुळे कुणाहि खेळ खेळणारांत जो एकप्रकारचा अभिनिवेश किंवा एकांगीपणा येण्याचा संभव असतो, तोहि त्यांच्या अंगीं नाही. पाश्चात्त्य नाटककार व रंगभूमि यांच्याशींहि त्यांचा चांगला परिचय आहे. त्यामुळे पूर्वपरंपरेवर पण प्रगतीचा मार्ग चोखाळूं इच्छिणाऱ्या सर्व प्रकारच्या नाट्याचा रसास्वाद घेऊं शकणाऱ्या, पण कुठल्याहि प्रवाहांत वाहून न जाणाऱ्या आणि

---

**नाट्य व रंगभूमि**–[ किंमत ३ रु. प्रकाशक–कार्यवाह, वनहट्टी ग्रंथ प्रकाशन मंडळ, नागपूर. ]

समतोल व विधायक वृत्तीने सर्व प्रकारच्या नाट्यविषयक प्रश्नांची चर्चा करणाऱ्या समीक्षकाचें दर्शन आपल्याला या लेखसंग्रहांत घडतें.

केवळ माहितीच्या दृष्टीने हा लेखसंग्रह चाळला तरी वाचकाला अनेक गोष्टी त्यांत आढळतील. 'बंगालींत शिवछत्रपति, बाजीराव, पानपतचें युद्ध, थोरले माधवराव यांवर नाटकें झालीं आहेत व हीं बहुतेक रंगभूमीवर गाजलीं आहेत' हें वाचून कुणाला आश्चर्य वाटणार नाही ? त्यांतल्या त्यांत थोरल्या माधवरावांवर बंगालींत नाटक लिहिलें जावें ही मोठी नवलाची गोष्ट आहे. या कर्तबगार पण दुर्दैवी पेशव्याचें चरित्र अत्यंत नाट्यपूर्ण असूनहि निबंधमालेच्या काळांत निर्माण झालेलें कीर्तन्यांचें नाटक सोडल्यास कुणीहि मराठी नाटककार किंवा कादंबरीकार या विषयाकडे वळलेला दिसत नाही. स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनीच कराव्यात म्हणून बंगाली रंगभूमीने प्रारंभीं केलेली कलावंतिणीची योजना आणि त्यांतल्या कांही नटींचे उद्गार हा भाग (पृ. १२२–२३) मोठा मनोरंजक व उद्बोधक आहे.

'नाटिका व भावबंधन' हा लेख बनहट्टींच्या चिकित्सक दृष्टीचें स्वरूप व्यक्त करण्याला समर्थ आहे. 'नाट्यवाङ्मय आणि त्याचा विकास' व 'इंदूर नाट्यशताब्दी अध्यक्षीय भाषण' हे विस्तृत लेख माहिती आणि धावती टीका या दोन्ही दृष्टींनी वाचकांना आवडतील. आजच्या अपकर्षाच्या स्थितींतून रंगभूमि कशी बाहेर पडूं शकेल याचाहि अनेक लेखांत लेखकाने सर्वस्पर्शी विचार केला आहे.

मात्र चर्चेच्या ओघांत प्रा. बनहट्टींनी व्यक्त केलेलीं सर्व मतें सर्वांनाच पटतील असें नाही. उदाहरण म्हणून त्यांचें पुढील विधान पाहावें. मराठी नाट्यवाङ्मयाच्या विकासाचें वर्णन करतांना ते म्हणतात, 'खाडिलकर ज्या काळांत नाटककार म्हणून चमकले, तो महाराष्ट्राच्या प्रखर ध्येयवादित्वाचा काळ होता. तेव्हा खाडिलकर हे त्या काळचे नाट्य-क्षेत्रांतील प्रतिनिधि असें आपण मानूं शकतों. तीव्र संकटांचे आघात सोसावे लागतांच महाराष्ट्रांतील पांढरपेशा वर्गाचा हा ध्येयवादितेचा ज्वर ओसरला आणि त्याची प्रतिक्रिया सुरू होऊन महाराष्ट्राची साक्षर जनता कांही काळ पांचट प्रणयलालसा व विकृत भावना-प्रधानता यांच्या अधीन झाली हा परिणतीचा टप्पा गडकऱ्यांच्या नाट्यकृतींत आपल्याला दृग्गोचर होतो.'

हें लिहितांना प्रा. बनहट्टींनी सामाजिक परिस्थिति व वाङ्मयीन प्रतिभा यांची विलक्षण गल्लत केली आहे ! गडकऱ्यांनी नाटकें लिहिलीं तीं १९१०–१८ या काळांत. या काळांत महाराष्ट्राचा ध्येयवाद निस्तेज झाला असें म्हणतां येईल काय ? टिळक मंडालेला असतांनाच 'भाऊबंदकी', 'सत्त्वपरीक्षा', 'राक्षसी महत्त्वाकांक्षा' वगैरे नाटकें लिहिलीं गेलीं ना ? टिळक सुटून येण्यापूर्वी गडकऱ्यांचें 'प्रेमसंन्यास' हें एकच नाटक लिहिलें गेलें होतें. टिळक सुटून आल्यावर पुढील सहा वर्षे महाराष्ट्राच्या तेजस्वी आविष्काराला उधाण भरती आली. या भरतीच्या काळांतच गडकऱ्यांनी आपलीं पुढलीं नाटकें लिहिलीं. त्या लिहिण्यांत देशभक्तीची अभिव्यक्ति नसेल तर तो गडकऱ्यांच्या व्यक्तित्वाच्या मर्यादांचा भाग आहे, त्यांच्या प्रतिभेच्या वैशिष्ट्यांचा भाग आहे. कोणताहि काळ कलावंतावर सत्ता चालवूं शकतो हें खरें ! पण ती फार मर्यादित प्रमाणांत. खाडिलकर हाडाचे देशभक्त होते. गडकरी स्वभावतःच कवि होते. लो. टिळक होमरूल लीगची चळवळ करीत असतांना आणि 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे' असा घोष करीत शिष्टमंडळ घेऊन विलायतेला निघाले असतांना गडकरी 'एकच प्याला' लिहीत बसले होते यांत अस्वाभाविक असें काय आहे ? आंतरिक प्रेरणेतूनच किंवा संवेदनेतूनच कलाकृतीचा जन्म होत असतो.

पांचट प्रणयलालसेचा व विकृत भावनाप्रधानतेचा आक्षेपहि असाच अस्थानीं आहे. जयंत व लीला यांच्या प्रणयचित्रणाला ' पांचट प्रणयलालसा ' कोण म्हणेल ? गडकऱ्यांच्या प्रतिभेंत भावनाप्रधानता होती हें खरें, पण तिला विकृत म्हणणें म्हणजे गडकऱ्यांच्या नाटकांतले अनेक दोष विसरायला लावणाऱ्या त्यांच्या उत्कट काव्यात्मकतेचें मूळच आपल्याला कळलें नाही असें म्हणण्यासारखें नाही का ? ● ● ●

वि. स. खांडेकर

## हरिभाऊ

मराठी कादंबरीच्या क्षेत्रांत हरिभाऊ आपटे ह्यांचें कर्तृत्व डोळ्यांत भरण्यासारखेंच आहे. खरें पाहतां हरिभाऊंनीच कादंबरीवाङ्मयाची गोडी समाजाला लावली. हरिभाऊंच्या पूर्वी कादंबरीलेखन झालें असलें तरी त्या लेखनाला कलादृष्ट्या सुस्पष्ट असा आकार नव्हता. कादंबरी ह्या वाङ्मयप्रकाराच्या त्या पुसट पाऊलवाटा होत्या. हरिभाऊंची कादंबरी ही खऱ्या अर्थानें कादंबरी झाली. म्हणूनच एका दृष्टीनें मराठी कादंबरीचे ते जनक म्हटले पाहिजेत. कादंबरीकार म्हणून हरिभाऊंचें यश इतकें उज्ज्वल आहे की, त्यांचें लेखन हें आजहि आदर्श वाटावें. त्यांच्या वाङ्मयाचा अभ्यास हा शेक्सपियरच्या वाङ्मयाच्या अभ्यासाप्रमाणे अद्यापिहि शिळा वाटत नाही. किंबहुना हरिभाऊ हा संशोधनाचा विषय व्हावा इतकी त्यांची योग्यता आहे. ह्या दृष्टीने डॉ. भिंगारे ह्यांच्या ' हरिभाऊ ' ह्या प्रबंधाचें स्वागत करावेंसें वाटतें.

' हरिभाऊ ' हा प्रबंध म्हणजे कै. हरि नारायण आपटे ह्यांच्या सर्व उपलब्ध वाङ्मयाचा कालानुक्रमी अभ्यास होय. लेखकाच्या मतें हरिभाऊंचा अभ्यास—विशेषतः त्यांच्या कादंबरी-लेखनाचा अभ्यास—सामाजिक कादंबऱ्या, ऐतिहासिक कादंबऱ्या अशा विशिष्ट वर्गीकरणावरच आतापावेतों झालेला आहे. हरिभाऊंचें प्रत्यक्ष लेखन मात्र असे वेगळे ' कप्पे ' करून भिन्न भिन्न कालीं झालेलें नाही. शिवाय हरिभाऊ व त्यांचें वाङ्मय ह्यांचा मेळ घालण्याचा अद्यापिहि प्रयत्न झाला नाही. हरिभाऊंसंबंधीच्या आजपर्यंतच्या अभ्यासांत नसलेली ही भूमिका प्रस्तुत प्रबंधांत दिसून येते.

प्रथम हरिभाऊंच्यावर ज्या युगाचे किंवा युगप्रवर्तकांचे संस्कार झाले त्या चिपळूणकर-टिळक-आगरकरादिकांच्या मतप्रणालीचा लेखकानें चिकित्सकपणें आढावा घेतलेला आहे. हरिभाऊंच्या वाङ्मयाच्या अभ्यासाची ही बैठक योग्य आहे यांत शंका नाही. आगरकरांचा सुधारणावाद हा हरिभाऊंना मान्य होता; पण चिपळूणकरांचे संस्कार त्यांच्यावर पुष्कळच खोल होते. हरिभाऊंची जीवननिष्ठा ही आगरकरांच्याच जातीची असली तरी उभयतांचा जीवनक्रम भिन्न स्वरूपाचा होता. आगरकरांचें जीवन कष्टमय असूनहि विजिगीषु वृत्तीचें होतें; परंतु हरिभाऊंचें जीवन पराभूत होतें. त्यांचा पिंड हा नेतृत्वापेक्षा म्हणजे अनुयायाचा असूनहि तो विधायक म्हणजे करणरूप होता. ह्याप्रमाणे हरिभाऊंच्या मनोभूमिकेचें लेखकानें निर्लेप वृत्तीनें विश्लेषण केलें आहे व त्यांच्या वाङ्मयांत व्यक्त झालेल्या त्यांच्या विचारसरणीचा

हरिभाऊ—[ लेखक : डॉ. ल. म. भिंगारे; प्रकाशक—दा. ना. मोघे, स्कूल व कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर. पृष्ठें ४५३+३+७; किंमत १० रुपये .]

कारणमीमांसा केलेली आहे. हें विवेचन हरिभाऊंच्या वाङ्मयाच्या अभ्यासास निश्चितच मार्गदर्शक होईल.

हरिभाऊंच्या व्यक्तिमत्त्वाची चर्चा करतांना लेखकाने एक विवाद्य विधान केलें आहे. तें म्हणजे 'आपल्यांचा जीवनक्रम सामान्य होता हें त्यांचें वैशिष्ट्य फार महत्त्वाचें आहे... सामान्याचा जीवनक्रम आणि असामान्य जीवननिष्ठा ह्यांच्या घर्षणांतून पडणाऱ्या ठिणग्या म्हणजे हरिभाऊंचें व्यक्तिमत्त्व होय' (पृ. ७९). ह्या विधानांत सामान्य जीवनक्रमाची व्याप्ति स्पष्ट नाही. परिस्थितीला शरण जाणें म्हणजे सामान्य जीवन असें लेखकाला सुचवावयाचें आहे की काय? तसें असेल तर बहुतेक सर्वच लेखक सामान्य जीवन जगतात असें म्हणतां येईल. मग हरिभाऊंच्याच बाबतींत सामान्य जीवनाचा प्रश्न कां महत्त्वाचा ठरतो? वस्तुतः कोणत्याहि लेखकाच्या लेखनाची दिशा ही त्याच्या विशिष्ट जीवननिष्ठेमुळेच ठरत असते ही जीवननिष्ठाच त्याला लेखनप्रवण करते. लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाचा विचार करतांना त्याचें जीवन व त्याची जीवननिष्ठा हीं अलग मानतां येणार नाही. हरिभाऊंचें चरित्र अलौकिक असल्याचें आजपर्यंत मानलें जाई अशी लेखकाची समजूत झाली असावी. त्याचीच प्रतिक्रिया त्याच्या उपरिनिर्दिष्ट विधानांत दिसून येते.

हरिभाऊंची पहिली कादंबरी 'मधली स्थिति' हिच्याविषयीं लेखकाचें मत असें कीं ह्यांतील साऱ्या पात्रांच्या स्थितींत अशी कोणतीहि एकसूत्रता नाही की जीमुळे 'मधल्या स्थितींतील लोकां'चा उल्लेख सार्थ मानतां येईल. 'प्रस्तुत पुस्तक मधल्या स्थितींतील लोकांची गोष्ट आहे' हें हरिभाऊंचें विधान अगदी ठिसूळ आहे असेंहि तो म्हणतो (पृ. १०२). ह्याचें कारण ह्या पुस्तकांत अनेक गोष्टी आहेत ह्या आशयाचें हरिभाऊंचें विधान व पूर्वोक्त विधान हीं परस्परविरुद्ध आहेत हें होय. ह्या कादंबरीच्या नांवाचा व रचनेचा इतिहास ध्यानांत घ्यावा ही लेखकाची विचारसरणी व 'मधली स्थिति' ह्या कादंबरीने शुद्ध वास्तववादाचा पायंडा पाडला हें त्याचें मत हीं दोन्ही मान्य होण्यास प्रत्यवाय नाही.

'गणपतराव' ह्या कादंबरीनें 'मधली स्थिति' ह्या कादंबरीपुढे प्रगति केली असें सांगून 'गणपतराव म्हणजे हरिभाऊच' ह्या काशीबाई कानिटकरांच्या विधानाची लेखकाने केलेली चर्चा मनोरंजक आहे. 'गणपतराव' ह्या कादंबरीच्या अपूर्णत्वाची कारणमीमांसा करतांना लेखक म्हणतो कीं, गणपतरावाची ग्रंथोद्भवता आणि हरिभाऊंचा आत्माविष्कार ह्या दोन घटकांचे संबंध अगदींच परस्परविरोधी नाहीत. गणपतरावाच्या कथेचें ठरविलेलें पर्यवसान आणि हरिभाऊंच्या जीवनांत घडलेलें पर्यवसान ह्यांतील भेदांत 'गणपतरावा'च्या अपूर्णतेचें बीज आहे. 'गणपतरावा'ची वैचारिक भूमिका हरिभाऊंचीच होती. स्वतःच्या आयुष्यक्रमांतील सुधारकी कर्तृत्व दाखवितां न आल्याने हरिभाऊंना आपल्या प्रतिपादनाचें स्वरूप बदलावें लागलें (पृ. १४३). लेखकाने मांडलेला हा विचार नवीन आहे. 'गणपतराव' ह्या कादंबरीच्या अपूर्णतेची मीमांसा आजपर्यंत इतकी सूक्ष्म झालेली नव्हती. ह्याप्रमाणे लेखकाने हरिभाऊंचे वाङ्मयविषयक प्रयोग व जीवनविषयक प्रयोग ह्यांच्यांत उघड संगति असल्याचें सिद्ध केलें आहे.

'पण लक्षांत कोण घेतो!' ह्या कादंबरीचा विषय केशवपनाच्या भयंकर चालीचे दुष्परिणाम हा नाही; तर तो स्त्रियांची परवशता व दास्यविमोचन हा आहे असें लेखकाचें मत दिसतें. प्रस्तुत कादंबरींत खरी शोकांतिका यमुनेची नसून गणपतरावांची आहे. स्त्रीदास्यविमोचक पुरुषांची ही परवशता आहे. लेखकाचा हा दृष्टिकोण विवाद्य आहे. वस्तुतः यमुनेचें

दुःख हेंच ह्या कादंबरीचें मुख्य सूत्र. कादंबरी वाचतांना वाचकांच्या मनावर यमुनेच्याच भयाण जीवनाचा परिणाम होतो. यमुनेच्या दुःस्थितीबद्दल लेखकाला वाटणारी करुणा प्रस्तुत कादंबरींत पदोपदीं प्रत्ययास येते. हरिभाऊंनी ज्या कालांत ही कथा रचली त्या कालाचा विचार करतां कादंबरीची मूळ बैठक हीच असणें स्वाभाविक वाटतें. म्हणूनच आमच्या मनें ह्या कथेचें निवेदन यमुनेच्याद्वारें करून कादंबरीकाराने ही आत्मचरित्रपर केली असावी. पुरुष-प्रधान समाजाचें ह्या कादंबरींत चित्रण असल्यामुळेच त्या समाजाच्या दोषांचें दिग्दर्शन तींत अपरिहार्यपणें झाल्यास नवल नाही.

हरिभाऊंच्या लेखनाचा चिकित्सक दृष्टीने विचार करतांना लेखकाने त्यांच्या कांही दोषांवरहि बोट ठेवलेलें आहे. लेखकाच्या मतें हरिभाऊंची मूळची विस्तारप्रधान शैली चिकित्सकतेला अनुकूल असल्यामुळे ती करूं लागतांना हरिभाऊंना भान राहत नाही व मग कलावंताच्या दृष्टिकोणाने त्यांना स्वतःलाच आपल्या पात्रांच्या त्याच त्या चर्चेसाठी बोलण्याबद्दल डोरेवजा मजकूर लिहून ठेवावा लागतो ( पृ. ३५७ ). ह्या चर्चेच्या संदर्भांत लेखक म्हणतो—' ललितवाङ्मयाच्या आविष्काराबाबत पूर्ण संयम पाळून एखाद्याच कृतीवर निर्मितिक्षमता केंद्रित व्हावयास हवी होती' (सदर). हें मत केवळ तर्काधिष्ठित नाही. ' वज्राघात ' कादंबरीचें उदाहरण घेऊन लेखकाने हा मुद्दा स्पष्ट केला आहे. इ. स. १९०८ ते इ. स. १९१७ ह्या कालखंडांतील हरिभाऊंचें लेखन मुख्यतः पृथक्करणात्मक असून त्यांचें कादंबरीलेखन हें विघटनात्मक म्हणावयास पाहिजे असा लेखकाचा दावा आहे. विश्लेषणाचे अॅनॅलिटिकल व डिस्-इंटिग्रेशन् हे दोन विभाग करून हरिभाऊंच्या वाङ्मयनिर्मितीचें सूत्र तो सांगतो. प्रस्तुत विवेचन संशोधनमूलक आहे हें निर्विवाद होय.

हरिभाऊंची परंपरा निर्माण झाली काय? हा एक विचारार्ह प्रश्न लेखकाने उपस्थित केला आहे. व्यक्ति किंवा परिस्थिति ह्यांच्या संदर्भांत हरिभाऊंच्या परंपरेचा संभव अधिक असतांना तिचा उल्लेख मात्र चिकित्सकपणें केलेला आढळूं नये ह्याचें त्यास आश्चर्य वाटतें. त्यांचा पिंड नेत्याचा नसून अनुयायाचा होता ही लेखकाची कारणमीमांसा ह्या बाबतींत पुरेशी नाही. हरिभाऊंच्या वाङ्मयक्षणाचें स्वरूप बाल्झॅक, झोला, शेक्सपिअर, रेनॉल्ड्स्, डिकन्स, स्कॉट इत्यादि लेखकांच्या वाङ्मयाचें त्यांनी जें परिशीलन केलें होतें त्यांतच सापडण्यासारखें आहे असें कां म्हणूं नये? शेवटीं हरिभाऊंच्या रचनेकडे सामाजिक, ऐतिहासिक ह्या विषयवार ठोकळेबाज वर्गीकरणावर अवलंबून राहणें धोक्याचें आहे असा लेखकाने इशारा देऊन हरिभाऊंच्या प्रधान लेखनवैशिष्ट्याचा आविष्कार अनुकरणातीत-श्रेष्ठत्वाचा असल्याने त्यांची परंपरा निर्माण झाली नाही हाच हरिभाऊंचा मोठेपणा होय, असा मार्मिक निष्कर्ष काढला आहे. हा निष्कर्ष विचारांना खात्रीने चालना देईल.

प्रस्तुत प्रबंधस्वरूप ग्रंथाचा विशेष म्हणजे लेखकाचा स्वतंत्र दृष्टिकोण हा होय. पारंपरिक मतें बाजूस सारून त्याने ह्यांत हरिभाऊंच्या वाङ्मयासंबंधी आपलीं मतें निर्भीडपणें मांडलीं आहेत. हरिभाऊंच्या वाङ्मयाच्या कालानुक्रमी अभ्यासानी ही नवीन पद्धति स्वीकारण्यांत लेखकाचें वैशिष्ट्य दिसून येतें. ह्या पद्धतींतून निघणारे निष्कर्ष विचारणीय ठरूं शकतील हा त्याचा आत्मविश्वास रास्त नाही असें कोण म्हणेल? हरिभाऊंच्या वाङ्मयनिर्मितीशीं निकटचे संबंध असलेले त्यांच्या व्यक्तिमत्त्वांतील पराभूत आणि बंडखोर हे दोन महत्त्वाचे घटक त्याने मानले आहेत. हरिभाऊंची वाङ्मयीन भूमिका व त्यांचें व्यक्तिमत्त्व ह्यांतील साधर्म्य दाखविल्यामुळे तर हें विवेचन महत्त्वाचें ठरतें.

सूक्ष्मविवेचनात्मक निर्लेप दृष्टिकोण, सखोल अभ्यास व निर्भीड मतप्रतिपादन हे प्रस्तुत प्रबंधाचे गुणविशेष होत. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे हरिभाऊंची सात्त्विक नि तेजस्वी वाङ्मयमूर्ति ह्या प्रबंधांत स्पष्टपणें पाहावयास मिळते.

अशा प्रकारचा हा ग्रंथ प्रकाशित करण्याचें धाडस करून मराठी वाङ्मयाच्या अभ्यासाला सक्रिय प्रोत्साहन दिल्याबद्दल प्रकाशक श्री. दा. ना. मोघे हे अभिनन्दनास पात्र आहेत. ● ● ●

र. वि. हेरवाडकर

## सौंदर्याचें व्याकरण

प्राचार्य डॉ. वारलिंगे यांनी वेळोवेळीं लिहिलेल्या कलास्वरूपविषयक नऊ लेखांचा समावेश प्रस्तुत १३० पानी पुस्तिकेंत करण्यांत आलेला आहे. पहिल्या चार लेखांत सौंदर्य-वाचक विधानांतील विधेय व उद्देश्य यांची चर्चा असून पुढील चार लेख रससिद्धान्ताच्या समीक्षणाकरितां लिहिलेले आहेत. नववा लेख कलेच्या हेतूसंबंधी असून शेवटीं एक सौंदर्य-विषयक परिशिष्ट ( श्री. कुरुंदकरांचा लेख ) जोडलें आहे.

डॉ. वारलिंगे तत्त्वज्ञान, मानसशास्त्र, पाश्चात्त्य सौंदर्यशास्त्र ( आणि आपलें जुनें पौरस्त्य साहित्यशास्त्रहि ) यांचे अभ्यासक आहेत. अर्थात् या शास्त्रांच्या व्यासंगामुळे डॉक्टर-साहेबांची एतद्विषयक स्वतंत्र अशीं मतें बनलीं आहेत. तथापि त्यांवर श्री. मर्ढेकर आणि श्री. दि. के. बेडेकर यांच्या विचारांचा परिणाम बराच झालेला दिसतो. या दोन 'युगप्रवर्तक' लेखकांबद्दल डॉ. वारलिंगे यांना आदर वाटत असूनहि त्यांनी या दोन्ही लेखकांशीं कांहीं बाबतींत असलेले आपले मतभेद स्पष्टपणें मांडले आहेत हें त्यांच्या विचारस्वातंत्र्याचें निःसंशय द्योतक आहे.

पहिल्या चार लेखांत कलामीमांसाविषयक पुढील प्रमेयें मांडण्यांत आलीं आहेत. १ सौंदर्यवाचक विधानांतील विधेयस्थानीं असलेलें 'सुंदर' हें विशेषण निरवयव, केवल व अस्तित्वविलक्षण असतें. २ कलाकृति किंवा सुंदरवस्तु सौंदर्यवाचक विधानांतील उद्देश्याच्या पदानें वर्णिली जाऊं शकते आणि ती अस्तित्ववाचक घटकांची असते. या प्रमेयानुरूप अस्तित्वमय घटकांचें पृथक्करण आणि ते घटक यांचा विचार पुढे केला आहे. 'प्राचीन कलाशास्त्रज्ञांना 'रस' या शब्दांत हे अस्तित्ववाचक घटक आणि त्यांचे संबंध अभिप्रेत होते' असा विचार मांडून डॉक्टरांनी जुन्या रसमीमांसेस हात घातला आहे, व आपली एतद्विषयक मतें विस्तारानें मांडलीं आहेत. असें हें प्रतिपाद्याचें संक्षिप्त रूप आहे.

या पुस्तिकेंतील प्रतिपादन मात्र अत्यंत दुर्बोध व क्लिष्ट झालें आहे. कला व सौंदर्य हे विषय सहज समजावून सांगणें हें थोडें कौशल्याचें व थोडें कठीण काम आहे असें मान्य केलें तरी त्यामुळें डॉ. वारलिंगे यांची येथील भाषा व विवेचनपद्धति यांचें समर्थन करतां येणार नाही. मूळ सूक्ष्म विषय समजावून देण्यास व्याकरण किंवा गणित यांचा साधनें म्हणून उपयोग अवश्य करावा, पण साधनांनी साध्य सुबोध होण्याच्या ऐवजी दुर्बोध मात्र होऊं नये !

**सौंदर्याचें व्याकरण**–[ लेखक : प्राचार्य **सुरेन्द्र शिवदास वारलिंगे**, एम्. ए, पीएच्.डी. प्रकाशक : **रा. ब. माढेकर**, अध्यक्ष, मराठवाडा साहित्य परिषद्, इसामियाँ बाजार, हैदराबाद दक्षिण. मूल्य–साडेतीन रुपये. ]

विवेचनांत काव्याचीं उदाहरणें नाहीत—( उदाहरणें फक्त दोन व तींहि सदोष आहेत). कांही चुकीच्या तर कांही संदिग्ध नव्या शब्दांमुळे प्रतिपादनाच्या दुर्बोधतेंत भरच पडली आहे. उदाहरणार्थ, पृष्ठ ३१ वर ' निर्मातृत्व हा कलेचा पहिला आणि महत्त्वाचा गुण आहे ' असें विधान केलें आहे. संदर्भावरून येथे ' निर्मेयत्व ' असा शब्द पाहिजे असें दिसतें. पण हा पहिलाच शब्द विवेचनांत अनेक वेळां आल्याने वाचकाचा घोटाळा होतो. पृष्ठ ४० वर ' वास्तविक साम्य, विरोध, समतोलपणा इत्यादि सौंदर्याचीं प्रसादचिन्हें असून ' असे शब्द आहेत. येथे ' प्रसादचिन्हें ' म्हणजे काय हें कळत नाही. कलेचें वर्गीकरण करतांना 'Interpretative' या इंग्रजी शब्दाला ' प्रतिक्रियात्मक ' असा मराठी पर्याय वापरला आहे ! पुस्तिकेचें नांव ' सौंदर्याचें व्याकरण ' असें असलें तरी सौंदर्याचा खुलासा स्पष्टपणें फारसा कोठे लागत नाही.

चौथ्या लेखापासून प्राचार्य बारलिंगे यांनी रसाबद्दल चर्चा करण्यास सुरुवात केली आहे. ' रस ही मानसिक वस्तु नाही आणि आनंद तर नाहीच नाही. ' रस या शब्दाने कलेचे अस्तित्ववाचक घटक आणि त्यांचे संबंध प्राचीन कलाशास्त्रज्ञांना अभिप्रेत होते. त्यामुळे भरतमुनीचा रस-सिद्धान्त मुळांत कलेच्या शारीर घटकासंबंधीचा सिद्धान्त आहे. रस आणि भाव या शब्दांची संदिग्धता आधुनिक टीकाकारांनी वाढविली आहे. रससिद्धान्त सांख्यशास्त्रांतून भरताने उचललेला आहे व तेथील तन्मात्राप्रमाणे रस हा वस्तुवाचक आहे. रसचर्चेत मानसशास्त्राचें काम नाही. अभिनवगुप्तापासून वाटव्यांपर्यंत सर्व लोक आनंदसिद्धांतवादी आहेत. स्थायीभाव म्हणजे मूळप्रेरणा किंवा सहजप्रवृत्ति हा जो अर्थ वाटव्यांनी काढला आहे तो चूक आहे. रसांत मानसिक कांही नाही असें म्हणतां म्हणतां पुस्तकांत emotions म्हणजे भावना यांच्या तत्त्वांची म्हणजे भावतत्त्वांची जोड असावी लागते असेंहि म्हटलें आहे.

वरील अनेक विधानांचा परामर्श घ्यावयाचा तर एक-दोन विस्तृत लेखच लिहावे लागतील. परीक्षणाच्या मर्यादेंत बसतील अशीं संपूर्ण उत्तरें देतां येणें कठीण. म्हणून जरूरीपुरते चार शब्द लिहून स्वस्थ बसणें भाग आहे. डॉ. बारलिंगे यांना हवा असणारा वस्तुवाचक रस प्राचीनहि मानीत होते. पण तो केवळ काव्यगत असतांना. रस कविगत, काव्यगत व रसिकगत असा मानला जाई. कविगत व रसिकगत ( यालाच शेवटचा निर्णायक रस म्हणतात ) हे दोन्हीहि रसप्रकार मानसिकच आहेत. भरताने केलेल्या विवेचनावरून स्थायीभाव, संचारीभाव व अनुभाव ह्या सर्व मानसशास्त्रीय संज्ञा आहेत हें अगदी उघड आहे व त्या अनुक्रमें Sentiment, Derived Emotions व Expressions of Emotions यांना सदृश आहेत. अर्थात् या मानसशास्त्रीय संज्ञा त्यांच्या मूळ म्हणजे व्यवहारांतील रूपांत भरतास अभिप्रेत आहेत असें कोणीच म्हणत नाही; म्हणजे त्या लोकधर्मी नसून नाट्यधर्मीच आहेत. त्या साधारणीकृत, व्यक्तिनिरपेक्ष, अंतर व तटस्थता यांनी गम्य अशा कलाप्रांतांतील आहेत. आम्ही जे मानसशास्त्र रससिद्धान्तांत आणतों तें या वस्तूंच्या मूळ रूपांबद्दलच; आणि मानसशास्त्राचा तेवढा संबंध सौंदर्यवाद्यांना मान्य व्हावा असें वाटतें. डॉ. वाटव्यांनी स्थायीभावांना सहजप्रवृत्ति किंवा Instinct असें कोठेच म्हटलेलें नाही. उलट त्यांनी Instinct पक्षाला विरोध केला आहे. काव्यानंद-मीमांसा करतांना डॉ. वाटवे यांनी अध्यात्मशास्त्राचा उपयोग केलेला नाही; मग ते आनंदसिद्धान्तवादी कसे ?

' रस या शब्दाने कलेचे अस्तित्ववाचक घटक आणि त्यांचे संबंध भरताला अभिप्रेत आहेत ' हें प्रमेय डॉ. बारलिंगे यांना सिद्ध करावयाचें आहे म्हणून त्यांनी शब्द, अर्थ व अनुभव हे ते घटक मानलेले आहेत; व त्यालाच जोडून रस, विभाव, अनुभाव आणि

व्यभिचारी भाव हे दिलेले आहेत. पैकी शब्द आणि अर्थ हे सर्वांनाच मान्य आहेत. अनुभव हा गृहीतच धरलेला असतो. त्यामध्ये मतभेद नाही. पण रसनिष्पत्तींत सांगितलेल्या विभाव, अनुभाव व व्यभिचारी भाव यांमध्ये ज्याला अस्तित्ववाचक व वस्तुनिष्ठ घटक म्हणतां येईल ते फक्त विभावच आहेत. डॉ. बारलिंगे जर स्थायीभावांनासुद्धा वस्तूच समजत असतील तर या वस्तुवाचक रस-सूत्रांत भरताने स्थायीभावांचा कां उल्लेख केला नाही तें त्यांनी सांगावें. तो नंतर व्यक्त व्हावयाचा असतो असें ते म्हणतील तर तो वस्तुरूप नव्हे असें म्हणणें प्राप्त आहे. स्थायीभाव म्हणजे 'उभा असलेला अर्थ' असें बारलिंगे म्हणतात; पण स्थायीभावांतील स्थायी या विशेषणाचा अर्थ 'चिरकाल चित्तांत टिकणारा असा आहे' व स्थायीभाव हे, संचारी म्हणजे चिरकाल न टिकणारे व एका रसांतून दुसऱ्या रसांत संचार करणारे चंचल असे जे व्यभिचारी भाव त्यांचे विरुद्धार्थप्रतिपादक आहेत.

रसाला वस्तुवाचक ठरविण्यास 'रस इति कः पदार्थः' या भरताच्या शब्दांतील 'पदार्थ' याचा अर्थ वस्तु करणें ही ओढाताण आहे. 'रस इति पदस्य कः अर्थः' असें कां घेऊं नये? रसव्यवस्था अपुरी, टाकाऊ व वस्तुसंग्रहालयांतच ठेवण्याजोगी आहे असें म्हणणाऱ्या आक्षेपकांचें समाधान रस हा—डॉ. बारलिंगे म्हणतात त्या अर्थानें—वस्तुवाचक ठरल्याने होईल असें वाटत नाही; कारण ते आक्षेपक पुढे करतात तीं कारणें अधिक गंभीर आहेत.

रससिद्धान्ताबाबत डॉ. बारलिंगे यांच्याशीं कांही मूलगामी व कांही वरवरचे असे कोणाचे मतभेद असले तरी त्यांनी केलेल्या या बाबतींतील विचारप्रवर्तनाबद्दल कोणाचें दुमत होईलसें वाटत नाही. भरताच्या सिद्धान्ताचें खरें स्वरूप व्यक्त होण्यास डॉक्टरसाहेबांच्या या चर्चेचा फार मोठा उपयोग अवश्य होईल. म्हणून त्यांच्या या व्यासंगपूर्ण प्रयत्नाचें अभिनंदनच करावयास हवें. ● ● ●

के. ना. वाटवे

## प्राचीन मराठी संतकवि

संतवाङ्मयाच्या पुण्यपावन गंगेंत अवगाहन करण्यांत ज्यांचा सारा जन्म गेला त्या कै. महाराष्ट्रभाषाभूषण आजगांवकरांच्या श्रद्धाशील अंतःकरणाचा जिव्हाळा त्यांनी लिहिलेल्या महाराष्ट्रकवींच्या चरित्रांत ओसंडून वाहतांना दिसतो. आजगांवकरांनी स्वतः तर या मंदाकिनीचें पाणी आकंठ प्राशन केलेंच, पण मराठीभाषी रसिकांच्या तृप्तीसाठी—व आजगांवकरांच्या मताप्रमाणे तुष्टीसाठीहि—कावडी भरभरून त्यांनी तें महाराष्ट्रालाहि सादर केलें; आणि एवढ्यावरच न थांबतां त्या मंदाकिनीचें 'मूळ'हि शोधून काढण्याचा परिश्रमपूर्वक प्रयत्न केला.

### संशोधनाचे तीन प्रकार

सुमारें ६० वर्षांपूर्वी राजवाडे, भावे, पांगारकर, देव, आजगांवकर प्रभृति संशोधकांनी महाराष्ट्रकवि-काव्य-संशोधनाच्या मनोज्ञ मन्वंतराचा पाया घातला. संशोधनाचे तीन

प्राचीन मराठी संतकवि—खंड १ ला [लेखक: म. भा. भू. जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर; प्रकाशक: सौ. कमला भास्कर आजगांवकर, हरिनिवास दादर, मुंबई २८. पृष्ठें २ + ३१ + ९ + ४९६, मूल्य १० रुपये.]

प्रकार असतात. संतांच्या वाङ्मयावरून त्यांच्या वाङ्मयीन वा सामाजिक कार्याचें मूल्यमापन करणें हा पहिला प्रकार. न्या. मू. रानडे यांनी ‘ Rise of the Maratha Power ’ हा ग्रंथ लिहून ( इ. स. १९०० ) अशा प्रकारचा पहिला प्रयत्न केला. जुने अप्रसिद्ध ग्रंथ किंवा कागदपत्र मिळवून ते विवेचनासह प्रसिद्ध करणें व त्यावरून कवीच्या कालाचा, काव्याचा वा कर्तृत्वाचा निष्कर्ष काढणें हा दुसरा प्रकार. राजवाडे, भावे, पांगारकर, देव हे दुसऱ्या प्रकारचे संशोधक. कवीच्या एकाच काव्याच्या अनेक प्रती मिळवून त्यांवरून त्याच्या काव्याची अधिकृत संहिता सिद्ध करणें हा तिसरा प्रकार. ओक, माडगांवकर इत्यादि संशोधकांची गणना तिसऱ्या प्रकारांत करतां येईल. आजगवांकरांची मनोवृत्ति या तीनहि प्रकारांहून जरा वेगळी होती. त्यांनी ज्ञात-अज्ञात अशा कवींचीं काव्यें प्रकाशित न करतां किंवा त्यांवरून कवींच्या वाङ्मयीन वा सामाजिक कार्याचें मूल्यमापन न करतां कवींच्या चरित्रांवर परिचायक लेख लिहिले व त्यांच्या काव्यांतले उतारे देऊन त्यांच्या प्रतिभेची, शैलीची व वाङ्मयकर्तृत्वाची ओळख महाराष्ट्राला करून दिली.

## संतचरित्रकार आजगांवकर ‘ आधुनिक महीपति ’

इ. स. १९०२ सालीं समग्र वामनी ग्रंथ अवलोकनांत आल्यावर महाराष्ट्रकविचरित्र-लेखनाची कल्पना आजगांवकरांना स्फुरली व इ. स. १९०७ सालीं त्यांच्या महाराष्ट्रकवि-चरित्राचा पहिला खंड प्रकाशित झाला. तेव्हापासून सतत पन्नास वर्षे संत-वाङ्मयाचें संकलन, परिशीलन व चिंतन करून शेकडो कवींचीं चरित्रें त्यांनी महाराष्ट्राच्या भाविकतेला सादर केलीं व ३००० पृष्ठांचा मजकूर ११ खंडांत प्रकाशित करून ‘ संतचरित्रकार ’ ही सतराव्या शतकांत महीपतीला मिळालेली पदवी पुन्हा एकदा सार्थ करून दाखविली. भाविकता, जिव्हाळा, चमत्कारांवरील श्रद्धा, जन्ममृत्युशक व वंशावळी यांच्या पारंपरिक माहितीवरील विश्वास इत्यादि दृष्टींनी आजगांवकरांची महीपतीशींच तुलना करतां येते. महाराष्ट्रांतल्या संतांचीं चरित्रें लिहून आजगांवकरांनी जें प्रचंड कार्य केलें, तीं चरित्रें त्यांनी ज्या भाविकतेने लिहिलीं व तीं लिहीत असतांना संतांच्या चमत्कारांचा, आख्यायिकांचा व दंतकथांचा त्यांनी ज्या श्रद्धाळूपणाने अनुवाद केला त्यावरून त्यांना ‘ आधुनिक महीपती ’ असेंच म्हटलें पाहिजे. ज्या वादांतल्या उत्तर-पक्षाने आजगांवकर संतवाङ्मयाचे अभ्यासक म्हणून एकदम प्रसिद्ध झाले, त्या ‘ ज्ञानदेव दोन नसून एकच ’ या त्यांच्या लेखाचें उगमस्थानहि त्यांच्या चिकित्सकतेपेक्षा भाविकतेंतच अधिक आहे.

## ‘ प्राचीन मराठी संत, कवि व संतकवि ’

पूर्वी लिहिलेल्या कविचरित्रांत नंतरच्या संशोधनाची व महानुभावीय कवींची भर घालून तीं अद्ययावत् माहितीसह प्रसिद्ध करावी असा आजगांवकरांचा मानस होता. त्या दृष्टीने ५ वर्षे परिश्रम करून मुकुंदराज ते मुक्तेश्वर या कालखंडांतल्या ४५ कवींच्या चरित्रांचें पुन-र्लेखनहि त्यांनी केलें व ‘ प्राचीन मराठी संतकवि–खंड १ ला ’ हा ग्रंथ सिद्ध केला. पण दुर्दैवाने तो त्यांच्या हयातींत प्रसिद्ध होऊं शकला नाही. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या स्नुषा सौ. कमला भास्कर आजगांवकर यांनीं प्रस्तुत ग्रंथ प्रकाशित करून प्राचीन मराठी संतांची व महाराष्ट्रांतल्या भाविकांची बहुमोल सेवा केली आहे.

आजगांवकरांनी ‘ महाराष्ट्र कविचरित्र ’ असें नांव आपल्या ग्रंथमालेला दिलें होतें. प्रस्तुत ग्रंथाचेंहि नांव ‘ प्राचीन मराठी संतकवि ’ हें आहे. पण, या ग्रंथांतले किती संत हे

कवि आहेत व किती कवि हे संत आहेत ? की प्रत्येक संत हा कवि असलाच पाहिजे अशी आजगांवकरांची समजूत होती ? महानुभाव कवींना **संत** म्हणतां येईल का ? शिवाय आजगांवकरांनी सादर केलेले संतकाव्याचे नमुने हे त्या विशिष्ट संतांचेंच काव्य आहे हें तरी कशावरून ? चांगदेव ( पृ. १८० ), वडवाळसिद्ध जगन्नाथ ( २५० ), भानुदास ( २५९ ), जनार्दनस्वामी ( २७१ ), जनीजनार्दन ( ३३८ ), दासोपंत ( ३४२ ), शिवकल्याण ( ३७५ ), मालो ( ३९५ ) इत्यादि संत हे संत असले तरी **कवि** नव्हते. त्यांच्या वाङ्मयांत 'कवित्व' नाही. यांतल्या कांहीं संतांनी ग्रंथ लिहिले आहेत. पण त्यामुळे त्यांना ग्रंथकार म्हणतां येईल, 'कवि' म्हणतां यायचें नाही. अर्थात्, कवींच्या मालिकेंत त्यांचा अंतर्भाव कसा करतां येईल ?—" **महाराष्ट्र कविचरित्र** हें ग्रंथाचें नांव एकदा मुकर केल्यावर एखादा कवि श्रेष्ठ प्रतीचा असो वा कनिष्ठ प्रतीचा असो, तो जोंपर्यंत कवि आहे, तोंपर्यंत त्याच्या चरित्राचा समावेश प्रस्तुत ग्रंथांत केल्याशिवाय गत्यंतर नाही " असें एका प्रस्तावनेंत सांगणाऱ्या [ महाराष्ट्र कविचरित्र, भाग ५ वा, प्रस्ता. पृ. २ ] आजगांवकरांनीं 'कवि' नसलेल्या संतांचाहि अंतर्भाव प्रस्तुत ग्रंथांत करावा, किंबहुना 'जनार्दनस्वामी कवि नसतांहि त्यांच्या चरित्राचा समावेश जर ह्या ग्रंथांत मीं केला नाही तर हा ग्रंथ अपूर्ण राहील' असें म्हणावें (२७१) याचें आश्चर्य वाटतें. भास्कर, दामोदर, नरेंद्र इत्यादि ज्या महानुभाव कवींचें चरित्रगायन आजगांवकरांनी प्रस्तुत ग्रंथांत केलें आहे त्यांना '**संत**' म्हणतां येईल का ?—अर्थात्, 'प्राचीन मराठी संत-कवि' यापेक्षा 'प्राचीन मराठी संत, कवि व संतकवि' हेंच नांव प्रस्तुत ग्रंथाला अधिक अन्वर्थक झालें असतें. जनार्दनस्वामींच्या काव्याचे नमुने सादर करतांना तें काव्य जनार्दनस्वामींचेंच आहे की काय याविषयीं आजगांवकरांची खात्री नाही ( २७६ ), किंबहुना, तें त्यांचें नसावें असेंच आजगांवकरांचें मत आहे ( २७४ ); आणि तरीहि जनार्दनस्वामींचें काव्य म्हणून त्यांनी वाचकांना तें खुशाल सादर केलें आहे. त्यांत 'काव्य' आहे की नाही हा प्रश्न वेगळाच.

### भाविकतेचा अतिरेक

भाविकता हा आजगांवकरांचा स्थायीभाव होता; व 'ही सत्पुरुषांची वाणी श्रोत्यां-नीहि भाविकपणानेच ऐकली पाहिजे' अशी त्यांची धारणा होती (२२१). भाविकतेच्या अतिरेकामुळेच संतचरित्रांतील चमत्कार, साक्षात्कार इत्यादि प्रकारांवर आजगांवकरांचा चट-कन विश्वास बसत असे. " चमत्कारांचें वाजवीपेक्षा अधिक स्तोम न माजविण्याची खबरदारी घेतली म्हणजे झालें " असें आजगांवकरांनी कितीहि सांगितलें असलें [ महाराष्ट्र संत कवयित्री, प्रस्ता. पृ० ३ ], तरी " चमत्कारांवर बनावटपणाचा छाप मारणें म्हणजे आपल्या ज्ञानाभि-वृद्धीच्या मार्गांत आपण होऊन अडथळा आणणें होय " [ महाराष्ट्र कविचरित्र, भाग ५ वा, प्रस्ता. पृ० ३ ] अशीच आजगांवकरांची शेवटपर्यंत भावना होती. या आपल्या भावनेच्या समर्थनाकरिता सर ॲम्ब्रोज फ्रेमिंग, न्या. मू. रानडे, डॉ. भांडारकर प्रभृति विद्वानांचे अभि-प्रायहि त्यांनी सादर केले आहेत ( प्रस्ता. पृ. २२, २३ ). संतचरित्रांतल्या घटनांना सत्याचा किंवा संभवनीयतेचा निकष लावण्याची आजगांवकरांची मनोवृत्तीच नव्हती. त्यामुळें 'सूर्य पश्चिमेकडे उगवला' ( १२१ ), 'मृत्यूनंतरहि नाथ तत्काळ उठून बसले' ( २९६ ) अशा चमत्कारांवर ते विश्वास ठेवतात व 'तुकारामबुवांस नामदेवांचा अवतार म्हणतात, तेव्हा आता वरील अभंग वाचल्यावर तुकारामबुवांची पत्नी जिजाबाई ही या राजाईचा अवतार होती असें धरून चालण्यास कांहीं हरकत नाही' ( ११३ ) असेंहि विधान ते सहजगत्या करतात. आजगांव-करांच्या संतचरित्रांत चिकित्सकतेच्या सूर्याचा प्रखर प्रकाश नाही, तर भाविकतेच्या चंद्राची

सुषमा आहे. भूगर्भांतून आवेगाने उसळणाऱ्या झऱ्याचा अवखळपणा नाही, तर आधीच दुतर्फा बांधलेल्या घाटांतून मार्गक्रमण करणाऱ्या पाण्याचा संथपणा आहे.

प्रस्तुत ग्रंथांतलीं बहुसंख्य चरित्रें आजगांवकरांनी महीपतीच्या संतचरित्रांच्या आधाराने लिहिलीं आहेत. किंबहुना, ' महीपतीच्या चमत्कारपूर्ण व अद्भुत संतचरित्रांचा आधुनिक मराठी गद्यांतला अवतार ' असेंच प्रस्तुत ग्रंथाचें वर्णन करतां येईल. गोरा कुंभाराचें मेलेलें मूल जिवंत होणें ( २८ ), ज्ञानदेवांनी भिंत चालविणें, रेड्याच्या मुखाने वेद बोलविणें (७९), विसोबांच्या पायांखाली प्रत्येक वेळीं नवें शिवालिंग आविर्भूत होणें ( ९४ ), पांडुरंगाने बालनामदेवांचा नैवेद्य खाणें ( १०९ ), पांडुरंगाने जनाबाईबरोबर दळणकांडण करणें ( १७५ ), सावता माळ्याने खुरप्याने आपलें पोट चिरून त्यांत पांडुरंगाला लपविणें ( १८४ ) इत्यादि महीपतींनी वर्णन केलेल्या चमत्कारांचा आजगांवकरांनी मनसोक्त अनुवाद केला आहे.

—पण या श्रद्धाशील भाविकतेमुळेच आजगांवकरांच्या संतचरित्रांत रसाळपणाहि आला आहे हें विसरून चालणार नाही. आजगांवकरांच्या रसाळ व प्रेमळ लेखनशैलीकरिता नामदेव, भानुदास व मुक्तेश्वर यांचीं त्यांनीं लिहिलेलीं प्रस्तुत ग्रंथांतलीं चरित्रें अवश्य वाचावींत.

### चिकित्सकतेचा अभाव

आजगांवकरांनी लिहिलेलीं संतचरित्रें भाविकता व रसाळपणा या दृष्टींनी कितीहि उत्कृष्ट ठरलीं तरी संतांच्या काव्याचें व कार्याचें यथायोग्य मूल्यमापन करणें मात्र त्यांना कधींच जमलें नाही. महाराष्ट्रांतल्या प्राचीन संतकवींच्या चरित्रांच्या, काळांच्या व काव्यांच्या बाबतींत इतकीं मतमतांतरें असतां आजगांवकरांनी, मुक्तेश्वराचा अपवाद वगळल्यास त्या त्या कवीच्या चरित्राचें किंवा काव्याचें स्वतंत्र विवेचन प्रायः कुठेंच केलें नाही. निरनिराळ्या संशोधकांच्या मतांचें संकलन मात्र त्यांनी साक्षेपाने व प्रांजळपणाने केलें आहे; आणि त्याबद्दल त्यांचें अभिनंदनहि केलें पाहिजे. पण, तें संकलन करतांनाहि भाविकतेच्या आहारीं आजगांवकर गेल्यामुळे 'दामोदर पंडित यांचा उद्धवगीता या नांवाचा आणखी एक ग्रंथ आहे' (४८,६६), ' नरेंद्रकवीजवळ कल्पनावैपुल्य आहे पण माधुर्य नाही ' (९२) अशीं चुकीचींहि विधानें त्यांच्या लेखणींतून बाहेर पडलीं आहेत. 'सेना न्हावी' या नांवाचा संत महाराष्ट्रांत खरोखरीच होऊन गेला की काय या बाबतींत अभ्यासकांत तीव्र मतभेद असतां व आजगांवकरांनाहि त्याची जाणीव असतांना (२३८) त्याची शहानिशा न करतां आजगांवकरांनी प्रस्तुत 'मराठी' संतकवींत मात्र त्याचा खुशाल अंतर्भाव केला आहे. " धुंडीराज माळूचा ' भक्तिकथामृत ' हा ग्रंथ निव्वळ गप्पांनी भरलेला आहे व त्यावर वाचकांनी बेतानेच विश्वास ठेवावा " असें वाचकांना बजावल्यावरहि ( २१८, तळटीप ) आजगांवकरांनी त्याच 'गप्पां' च्या आधारावर विसंबून नरहरि सोनाराचें चरित्र लिहावें याचें आश्चर्य वाटतें. नाही म्हणावयाला, मुक्तेश्वर हें मुक्तेश्वराचें मुद्रानाम नसून जन्मनांव होतें व ' लीलाविश्वंभर ' हें अव्यक्त दत्तात्रेयाचें नांव नसून मुक्तेश्वराच्या गुरूचें नांव होतें हें सिद्ध करतांना मात्र आजगांवकरांच्या भाविक लेखणीला विवेचकतेचा स्पर्श झालेला दिसतो. असो.

**प्रचंड कार्य**

आजगांवकरांनी केलेलें कार्य प्रचंड आहे. प्राचीन संतांचें व संतकाव्यांचें संशोधन करणें, संतांच्या काव्याची अधिकृत संहिता ठरविणें, एकाच कालखंडांत होऊन गेलेल्या एकाच नांवाच्या अनेक कवींच्या काव्यांतून प्रत्येकाचें काव्य अचूक निवडून काढणें व तें त्याचेंच कां हें ठरविणें, मूळ हस्तलिखितांची नक्कल करणाऱ्या 'लेखकूं'चे लेखनप्रमाद व त्यांचें 'जादा' कवित्व हुडकून काढणें इत्यादि प्रकार फार जिकिरीचे असतात. मोठमोठ्या संशोधकांनाहि भ्रमांत टाकणारे हे प्रकार आहेत. अशाहि स्थितींत आजगांवकरांनी जन्मभर प्राचीन मराठी कवींचा व काव्यांचा व्यासंग करून अनेक कवींच्या चरित्रांचें व त्यांच्या काव्यांचें मनोज्ञ दर्शन वाचकांना घडविलें आहे. कृष्णदास मुद्गल या संतकवीने

कथापंथीं महाराष्ट्र वचनें । परि हीं रसिकें अतिगहनें
जैसी वनमक्षिकांचीं वदनें । मधूतें श्रवती ॥
नाना संस्कृत हें चंद्रमंडळ । महाराष्ट्र चंद्रिका केवळ
संस्कृत स्वातीचें जळ । मराठी मुक्ताफळें ॥
जैसें दधीचें मंथन केलें । त्यांतून नवनीत निवडिलें
तैसें संस्कृतापासोनि जाहलें । महाराष्ट्र कवित्व ॥
इक्षुदंडु रसनायकु । शर्करा पुढें तयाचा पाकू
गोडीचा विचार अधिकू । रसनायकीं जाणावी ॥

या शब्दांत वर्णिलेली मराठीची थोरवी वाचून कुणाला अभिमान वाटणार नाही ?

आजगांवकरांनी संतचरित्रलेखनाचें कार्य केलें नसतें तर त्यांनी प्रकाशांत आणलेल्या अनेक संतांची, कवींची व त्यांच्या कवित्वाची माहितीहि महाराष्ट्राला झाली नसती. सामराज, हरिबुवा भोंडवे, भैरव अवधूत ज्ञानसागर या कवींचीं उदाहरणें या बाबतींत देतां येतील. या कवींच्या काव्यांचा शोध पहिल्यांदा आजगांवकरांनीच लावला. या दृष्टीने आजगांवकरांचे महाराष्ट्रावर फार उपकार आहेत. मराठी संतांचा चरित्रकोश व त्यांच्या काव्यांचें विहंगमदर्शन असें दुहेरी स्वरूप असलेला प्रस्तुत बहुमूल्य ग्रंथ प्रकाशित करून आजगांवकरांच्या स्नुषा सौ. कमला भास्कर आजगांवकर यांनी फार मोठें वाङ्मयकार्य केलें आहे. प्रस्तुत ग्रंथ प्रत्येक मराठी भाषकाने आपल्या संग्रहीं ठेवावा अशी इच्छा व्यक्त करून त्याचा दुसराहि खंड प्रकाशकांनी लवकरच प्रकाशित करावा अशी मी त्यांना विनंती करतों. ● ● ●

**सुरेश म. डोळके**

## भिल्लवीर कालिंग

मराठीचे सुपरिचित लेखक श्री. गो. नी. दाण्डेकर थोरापासून पोरापर्यंत लिहितात, लिहूं शकतात. कुमारकिशोरांसाटी लिहिणारे मराठी लेखक मुख्यतः कै. सानेगुरुजी, भा. रा. भागवत,

**भिल्लवीर कालिंग**—[ लेखक : गो. नी. दाण्डेकर; प्रकाशक : महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती, मूल्य दोन रुपये.]

भ श्री. पंडित, इत्यादींशीं 'भिल्लवीर कालिंग'च्या कर्त्याची तुलना करतां येईल. लेखकाचे भावनील व्यक्तिमत्त्व व बालमन जाणण्याची क्षमता या दोन्ही बाबतींत दांडेकर त्या ओळींतले आहेत. बाल म्हणजे सहा ते सोळा, अठरा वर्षे या मोघम हिशेबांत त्या कालखण्डाचे दोन भाग पाडून त्यांतील बारा ते सोळा, अठरा हा भाग त्यांनी आदर्शाच्या मागे धावणारा ठरविला आहे. किशोरांसाठी लिहिणारे तसले कांही गृहीत धरतील तर त्यांचें वाङ्मय जोरकस होईल याची या पुस्तकांत साक्ष मिळते.

त्याच वेळीं दुसरेंहि एक अवधान लेखकाने सांभाळलें आहे. सोळा-अठराचें उमलूं लागलेलें मन आपला पोरपणा कबूल करीत नाही. प्रौढ वाङ्मयाचें वावड तर त्याला पचत नाही आणि पोरांसाठी असलेल्या गोष्टी वाचण्यांत त्याला कमीपणा वाटतो. 'भिल्लवीर कालिंगा'च्या लेखकाने तें जोखूनच आपलें निवेदन ठरविलें असें दिसतें. आपण काकाबाबांसारखेंच बडें पुस्तक वाचांत आहों, लेखक आपल्याला लहान समजत नाही, माचीवरला बुधा किंवा पूर्णामायची लेकरं यांतली कथनाची तऱ्हा व आपल्यासाठी लिहिलेल्या पुस्तकांतली निवेदनपद्धति यांत त्याला फरक वाटत नाही.

भारताच्या इतिहासकालीन अरण्यांतला सहवास व सहकारी लाभल्याने कुमार-वाचकांस गंमत वाटते. त्या परीकथेंतल्या नसले तरी इतिहासाच्या अद्भुत वातावरणांत तो स्वतःच्या नकळत रमतो; शिवाय आदर्शाच्या मागेहि धावतो. 'माचीवरल्या बुधा'तलें वनजीवन आणि 'कालिंग'मधला निसर्ग यांत 'मुलांनो!' हा फरक नसल्याने पक्तिप्रपंच त्याला वाटत नाही.

व्यक्तिचित्रणं सोज्ज्वळ, बरीचशीं साने गुरुजींसारखीं. खलपात्र न जमणें हाच दाण्डेकरांचा विशेष. अठरावें वर्ष अद्भुततेकडून संघर्षांकडे जात असतें. संघर्ष या वयांत प्रौढापेक्षाहि जास्त प्रभावी ठरतो. 'कालिंग'मध्ये बंधुप्रेम, मित्रप्रेम व शत्रूशीं झुंज हे प्रकार त्या दृष्टीनेच गौरवास्पद वाटतात. युयुत्सु व सेवावृत्तीचीं मनें घडविण्याचें सामर्थ्य या पुस्तकांत आहे.

या व अशा पुस्तकांना कुमारांच्या शालेय अभ्यासक्रमांत स्थान मिळणें आवश्यक आहे. वाङ्मयासोबत इतिहास—व तोहि आदर्श सांगणारा, माणसं घडविणारा—'भिल्लवीर कालिंग' मध्ये सापडतो. ● ● ●

मधुकर केचे

## अठराशें सत्तावनचा महाराष्ट्र

कराडचे श्री. पु. पां. गोखले हे राजकीय चळवळींत मुख्यतः समाजसेवक म्हणून लोकविश्रुत झाले असले तरी साहित्यनिर्मितीचा त्यांचा उद्योग तीन तपांपूर्वीपासूनचा आहे. 'जननीजनकज' हें त्यांचें साहित्यक्षेत्रांतल्या प्रारंभिक संचारावेळचें नांव आणि "झांकलें माणिक" हें पुस्तक ह्यांचा आठव फारच थोड्यांना असेल !

---

**अठराशें सत्तावनचा महाराष्ट्र**—[ लेखक : पु. पां. गोखले, कराड; उत्तर-सातारा-जिल्हा-स्वातंत्र्य-समर-शताब्दी-महोत्सवाचें प्रकाशन. किंमत सव्वा रु. ]

केंद्र-सरकारने भारतीय स्वातंत्र्याच्या इतिहासाची साधनसामग्री संकलित करण्याच्या हेतूने ठिकठिकाणीं केंद्रें स्थापून संशोधकांकरवीं तो उद्योग आरंभिला होता, त्यांत श्री. गोखले हे पुणें-सातारा विभागांत कार्य करीत होते. पण सरकारने तो उद्योग आवरता घेतल्यामुळे संशोधकांनी गोळा केलेली कागदपत्रें सरकारी दप्तरखान्यांतच पडून राहिलीं होतीं. श्री. गोखले यांना तेव्हा अशी जी कांही माहिती उपलब्ध झाली होती, तिचा उपयोग ह्या पुस्तकाच्या कामीं त्यांना झाला असावा.

पुस्तकाची मांडणी पाहूं जातां असें दिसतें की, १८५७ च्या स्वातंत्र्य-समरांत उत्तरेकडे जी ठळक मंडळी ( नानासाहेब पेशवे, बहादुरशहा, राणी लक्ष्मीबाई, तात्या टोपे, मंगल पांडे इत्यादि ) चमकलीं त्यांना पहिल्या ५।६ प्रकरणांत क्रमाक्रमाने अभिवंदनें आहेत; आणि तदुत्तरच्या १२।१३ प्रकरणांत त्या उत्तरेकडील क्रान्तियुद्धाच्या ज्वाला दख्खनमध्ये कसकशा पसरल्या आणि त्यांतल्या ठिणग्या कुठेकुठे कशा उडाल्या आणि भडकल्या यांचें बारीकसारीक तपशिलासह प्रवचन आहे. विलायती अखबार-अहवालांच्या आधाराबरोबर ज्ञानप्रकाश, ज्ञानचक्षू, टाईम्स ऑफ इंडिया, अशांसारख्या तत्कालीन वृत्तपत्रांच्या अवतरणांचा उपयोग करून हें सर्व प्रवचन बळकट करण्यांत आलें आहे. १८५७ च्या बंडापूर्वीचा एक पोवाडा ( ज्ञानप्रकाश १४–४–१८५६ मधून ) ह्या ग्रंथांत उद्धृत करण्यांत आला आहे. कोणी एक " राव वर्वे " हा त्याचा कर्ता आहे. ह्या पोवाड्यावरून सामान्यांच्या मन:स्थितीचा कयास करतां येतो. अशा किती तरी बारीकसारीक नोंदीहि श्री. गोखले यांनी साक्षेपाने करून घेतल्या आहेत. त्यामुळे पुस्तक अभ्यासकाला उपयुक्त आणि सामान्यासहि वाचनीय झालें आहे.

श्री. गोखले यांची भाषाहि वेधक आहे—अस्सल मराठी आहे. एखाद्याचें अवतरण भाषांतरित करून देतांना देखील टणकपणा ते यथातथ्य रीतीने दाखवितात. ( देहान्त–प्रायश्चित्ताची शिक्षा ) " पाहणाराचीहि चांगलीच हबेलंडी उडते," " मनुष्य आखतो एक आणि कागद फाटतो भलताच, " " प्रार्थनांनी का लुटारू-हात हे वरद होतात ? " अशा प्रकारचीं उदाहरणें पुष्कळ देतां येतील. राणी लक्ष्मीबाईचें लग्नपूर्व नांव मनू होतें, हें सांगतांना लेखकाचें मन कसें हालले आहे—कसें कल्पनातरल झालें आहे, तें वाचतांना ही लेखणी नुसतीच अखबारनवीसाची नसून साहित्यिकाची आहे, याचा प्रत्यय येतो.

पुस्तकाला मुंबई राज्याचे मुख्य मंत्री ना. यशवंतरावजी चव्हाण यांचे समर्पक चार शब्द " प्रस्तावना " म्हणून लाभले आहेत ह्यांत केवळ उपचार नसून औचित्यहि आहे. ● ● ●

य. दि. पेण्ढरकर

## भारताचा आर्थिक विकास

**अर्थशास्त्रावरहि मराठींत उत्तम पुस्तकें लिहितां येतात हें सिद्ध करणारें एक सुबोध पुस्तक–भारताचा आर्थिक विकास.**

मानवाला एखाद्या असाध्य शास्त्राचें आकलन होण्यासाठी कोणती भाषा त्यास उपयोगी पडेल ? असा प्रश्न जर विचारला तर त्याचें एकच उत्तर देतां येईल आणि तें म्हणजे

**भारताचा आर्थिक विकास**—[ लेखक : प्रा. प्र. चिं. शेजवलकर; प्रकाशक : इनामदार बंधु, पुणें २. पृ. १७२, मूल्य ३ रु. ]

अनुक्रमणिका

' मातृभाषा. ' साहजिकच महाराष्ट्राची मातृभाषा मराठी असल्यामुळे महाविद्यालयांतील उच्च शिक्षण मराठींतच देण्यांत यावें असा विचार मराठी विद्वानांनी जनतेसमोर ठेवला. विद्येचें माहेरघर असलेल्या पुण्याच्या पुणें विद्यापीठानें मराठी भाषेला राष्ट्रभाषा व आंग्लभाषा यांच्या--इतकाच मान मिळावा व सामान्य जनतेला आंग्ल भाषेत विद्यापीठांतील ज्ञान मिळविण्या-साठीं जो फार त्रास घ्यावा लागे तो दूर करण्यासाठी मार्च १९५९ मध्ये होणाऱ्या साहित्य, व्यापार व शास्त्र यांच्या पदवी-परीक्षा उमेदवारास मराठी माध्यमाद्वारे देतां येतील असा ठरावहि संमत केला आहे. ह्या पुणें विद्यापीठाच्या मराठी माध्यमासंबंधीच्या धोरणाला पोषक असें लेखन होत नाहीं अशी रास्त तक्रार केली जाते. ही उणीव कांही अंशांनी प्रा. प्र. चिं. शेजवलकर यांनी लिहिलेल्या ' भारताचा आर्थिक विकास ' या पुस्तकाने भरून निघेल. या दृष्टीने प्रा. शेजवलकर यांनी हें पुस्तक लिहिण्यासाठी घेतलेले परिश्रम कोणासहि स्पृहणीय वाटतील.

या पुस्तकांत शेजवलकरांनी भारतांतील आर्थिक क्षेत्रांतील चालू घडामोडींचा आढावा घेतला आहे. भारताचा आर्थिक विकास दाखवितांना निरनिराळ्या अर्थव्यवस्थारूपी कमळाच्या १४ पाकळ्यांचा विकास कसा होत गेला हें दाखविलें आहे. समाज-विकास झाल्या-शिवाय देशाचा आर्थिक विकास होणें अशक्य असल्यामुळे लेखकाने आपलें ' भारताचा आर्थिक विकास ' हें पुस्तक लिहितांना ' समाज-विकास योजनांनी ' च ह्या आर्थिक विकासास प्रारंभ केला आहे. द्वितीय पंचवार्षिक योजनेचीं उद्दिष्टें व तिची रूपरेषा लेखकानें बारकाईने दाख-विलेली आहे. 'आपलें राष्ट्रीय उत्पन्न' हें प्रकरण सर्वोत्तम आहे. ' कामगार-संघटनेची चळवळ ' हें प्रकरण सामाजिक दृष्ट्याहि महत्त्वाचें आहे. लेखकाच्या मतें कामगारांनी राजकारणांत भाग घेऊं नये. पण या मताशीं पुष्कळजण सहमत होणार नाहीत. ' औद्योगिक अर्थपुरवठ्याचा प्रश्न ' हें माहितीवजाच प्रकरण आहे. ' आयुर्विम्याचें राष्ट्रीयीकरण ' या प्रकरणांत त्या राष्ट्रीयी-करणाचीं उद्दिष्टें नीट हाताळलीं आहेत. ' ग्रामोद्योग व उद्योगधंदे ' हें प्रकरण बरें आहे. ' आधुनिक उद्योगधंद्यांचा विकास ' ह्या प्रकरणांत टीकात्मक भाग कमी आहे. बहुतेक कायदे मजूरविषयक आहेत. आर्थिक क्षेत्रांतील प्रत्येक महत्त्वाच्या क्षेत्रावर माहितीपूर्ण व विस्तृत विवेचन या पुस्तकांत ग्रथित झालें आहे असें या पुस्तकांतील विविध प्रकरणांच्या वर केलेल्या पृथक्करणावरून आढळून येईल.

लेखकाची भाषाशैली ओघवती आहे. पुस्तकाचें पहिलें प्रकरणच वाचकाच्या मनाची पकड घेतें. प्रा. शेजवलकरांनीं अर्थशास्त्रासारखा अवघड विषय अत्यंत सोप्या भाषेत, मुख्यतः सामान्य वाचकांच्या हातांत द्यावयाचा असल्यामुळे, हाताळण्याचा प्रयत्न केला आहे. अर्थ-शास्त्राच्या मूलभूत सिद्धांतांची तात्त्विक चर्चा लेखकाने गाळली हें फार चांगलें केलें आहे.

स्वातंत्र्योत्तर काळाची राष्ट्राची सामाजिक,आर्थिक व राजकीय प्रगति करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. ज्या वेळेस आपण देशांत साम्यवादी समाजरचना निर्माण करीत असतों, बेकारीचें निर्मूलन करण्याचा प्रयत्न करतों व देशाचें औद्योगीकरण करण्याची खटपट करतों त्या वेळेस आपण लोकशाहीचीं मूल्यें दृष्टीआड होणार नाहीत अशी खबरदारी घेणें आवश्यक आहे. जनता जागरूक, जिज्ञासु व चिकित्सक असणें हें लोकशाहीचें एक महत्त्वाचें मूल्य आहे, या दृष्टीनें आर्थिक व राजकीय घडामोडींचे अद्ययावत् ज्ञान देणारे ग्रंथ निर्माण होणें आवश्यक आहे. विशेषत: भारतांत अमेरिकन भांडवलशाही व मानवाचें व्यक्तिमत्त्व नाहीसें करणारा

रशियन साम्यवाद यांचा सुवर्णमध्य गाठणारी साम्यवादी समाजरचना जेव्हां आपण प्रस्थापित करतों तेव्हां सरकारी मालकी व नियंत्रणें वाढत जाण्याची शक्यता असल्यामुळे रशियन हुकूमशाही निर्माण होणार नाही अशी काळजी घेण्यासाठी आपला भारतीय समाज जागरूक राहण्यासाठी आर्थिक व राजकीय घडामोडींचें ज्ञान पुस्तकाद्वारें मिळणें आवश्यक आहे. या दृष्टीने प्रा. प्र. चिं. शेजवलकर यांचें 'भारताचा आर्थिक विकास' हें पुस्तक स्वागतार्ह आहे. ● ● ●

ना. कृ. गोडबोले

## अवलिया

सौ. मुक्ताबाई दीक्षित यांचें हें नवें नाटक चार अंकी असून त्यांत कांही छांदिष्ट व्यक्तींचें एक कुटुंब प्रामुख्याने चितारलें आहे. घाटपांडे आजोबा हे या नाटकांतील वयाने वडील तसेंच गुणाने श्रेष्ठ पात्र. यांच्या घरच्या दिवाणखान्यांतच चारहि अंकांतील घटना घडून येतात. घाटपांडे कुटुंबांतील शरयू, व देशमुख आडनांवाच्या लब्धप्रतिष्ठित घराण्यांतील हेमंत यांचें प्रेम असतें. त्यांच्या लग्नाच्या आड येणाऱ्या कांही समजुतींचें निराकरण कसें होतें ही या नाटकांतील मुख्य घटना. या घटनेच्या अनुषंगाने नाटककर्त्रीने दोन्ही कुटुंबांतील व्यक्तींच्या स्वभावांतील खाचाखोचा, छंद-फंद चांगले रेखाटले आहेत. खरी प्रतिष्ठा कोणती व खोटी कोणती हें सहजीं दर्शविण्याचा लेखिकेचा यत्न दिसतो.

नादिष्ट माणसें प्रत्येक कुटुंबांतच थोडीफार असतात; पण सर्व माणसें नादिष्टच असलेलें कुटुंब सौ. दीक्षित यांनीं चित्रिलें आहे (अर्थात् नायक व नायिका हे याला अपवाद होत!) घाटपांडे कुटुंबांतील व्यक्ति लहरी, त्याचप्रमाणे देशमुख कुटुंबांतील व्यक्तीहि लहरीच आहेत; परंतु घाटपांडे मंडळी साधीभोळी, सरळ, आपापल्या नादांत गुंग असलेली अशी; तर देशमुख हे प्रतिष्ठित व धनकांचनसंपन्न अतएव तोऱ्यांत वागणारे आहेत. सौ. देशमुख याहि अर्थातच दि. ब. देशमुखांच्या सहवासाने उच्चभ्रू बनलेल्या! या देशमुखांचा दिखाऊ मोटेपणा एका मजेदार घटनेमुळे कसा उघडा पडतो हें नाटकांत दिसून येतें. लेखिकेची सहानुभूति घाटपांडे मंडळीच्या बाजूस आहे असें दिसतें, व आजोबा देशमुखांना शेवटीं शेवटीं जो 'उपदेश' करतात त्यावरूनहि हें स्पष्ट होतें. सामाजिक प्रतिष्ठेच्या खोट्या कल्पना बाळगायच्या, राहणीचें मान वाढवायचें, दुसऱ्यापेक्षा वरचढ होण्यासाठी धडपड करावयाची यांत 'समाधान' लाभत नाही, हेंच तत्त्व पटवून देण्याचा लेखिकेचा मानस दिसतो.

एक 'नादिष्टांचें नाटक' म्हणून गंमतीने पाहिलें वाचलें तर या नाटकांतील मौजेंत रसिकहि सहभागी झाल्याशिवाय राहणार नाहीत. लेखिकेच्या संवादलेखनांतहि एकप्रकारचा खुसखुशीतपणा आहे.

नाटकांतील सर्व व्यक्तिचित्रांत आजोबांचें व्यक्तिचित्र उठावदार झालें आहे; परंतु "आपल्या अंतरात्म्याची साद ऐकणारे" हें जें त्यांचें वर्णन नाटकांत एके ठिकाणीं आलें

**अवलिया**–[ नाटक : लेखिका : **सौ मुक्ताबाई दीक्षित**; प्रकाशक : दि इंटरनॅशनल बुक सर्व्हिस, पुणें ४. किं. २–८–० रु. ]

आहे त्याचा प्रत्यय आणून देणारी एखादी मार्मिक घटना नाटकांत दिसत नाही, हें खटक-ल्यावाचून राहत नाहीं. सारींच पात्रें नादिष्ट बनविण्याचेंहि नेमकें उद्दिष्ट ध्यानांत येत नाही.

आज समाजापुढे येणाऱ्या या नाटकांतील कथानकाचा काळ १९४३ चा म्हणजे १५ वर्षांपूर्वीचा कां कल्पिला आहे, हेंहि नीटसें लक्षांत येत नाही. पोलिस कांही अल्पस्वल्प संशया-वरून दोन्ही कुटुंबांतील मंडळींना उगीचच पकडतात व पोलिसचौकीवर डांबतात, या घटने-साठी तर हा काल कल्पिला नाहीना असें वाटतें. अन्य कांही घटनेची योजना करून, आजचा काळ कल्पिला असता तर नाटक प्रेक्षक-मनाच्या अधिक जवळ आलें असतें. अर्थात् आजच्या नाटकांतल्या उदार, प्रेमळ, निःस्वार्थी आजोबांवर शरयू व हेमंत हे सादर प्रेम करतात तसेंच रसिकहि करतील यांत शंका नाही. ● ● ●

वि. म. कुलकर्णी

## जांभळाचे दिवस

श्री. व्यंकटेश माडगूळकर यांच्या या नवीन कथासंग्रहांत त्यांच्या लेखणीचे अनेक विशेष उठावदारपणें व्यक्त झाले आहेत. आपल्या कथाविषयाची मूर्ति, स्वच्छ नितळ भाषेच्या चौरंडोलांत श्री. माडगूळकर हे नेहमीच मोठ्या डौलदारपणें उभी करतात व ती पाहून रसिकांचें भान हरपतें. ग्रामीण परिसर, त्यांत वावरणाऱ्या व्यक्तींचीं मोकळीं मनोगतें व सजीव चित्रणें हा माडगूळकरांच्या कथांचा खास विषय.

या संग्रहांतहि अशा कथा बऱ्याच आहेत व त्या पिकलेल्या जांभळांसारख्याच रसाळ व रंगदार आहेत. त्यांना त्यांची अशी एक विशिष्ट चव आहे. 'बाजाराची वाट' हा त्यांतला एक नमुना. 'ओल्या हळदीच्या गाभ्यासारखी' काया असलेली तरुण, विवाहित 'बंचा' आणि वाटेने तिच्या संगतसंगत चाललेला ओळखीचा एक गांववाला यांच्या मनांत चाललेला भावनांचा चोरटा लपंडाव माडगूळकर मोठ्या चटकदार रीतीने व्यक्त करतात. 'लोणी आणि विस्तू'—मधील पात्रें मुंबईसारख्या शहरांत राहत असलीं तरी तीं आहेत खेड्यांचींच. कार्ड-पाकिटें लिहिणारा रघू आणि त्याला भुरळ घालणारी चिंगा यांत दिसतात! धीट चिंगा आपल्या मावशीला चिंगारा देऊन निघून जाते आणि अधीट रघू कार्डेंच लिहीत बसतो हें चित्र माडगूळकरांनी आपल्या वास्तवदर्शी लेखनशैलीने कुशलतेने रेखाटलें आहे. देशावरील खेड्यांतील लोकांची भाषा व भावना हुबेहूब रेखाटण्यांत माडगूळकरांचा हात धरणारा लेखक मराठींत क्वचितच आढळेल, हें या संग्रहांतील 'शाळातपासणी 'सारख्या मजेदार गोष्टीवरूनहि ध्यानांत यावें. खेडेगांवांतील खरीखुरी परिस्थिति व लोकांची चालरीत माडगूळकर बरोबर ओळखतात, त्याचप्रमाणे ती त्यांच्याच शैलींत ते यथातथ्य रेखाटूं शकतात. चंची खोलून, निवांतपणें गप्पा मारणाऱ्या स्नेहाळ व गोष्टीवेल्हाळ सोबत्याप्रमाणे माडगूळकर आपली गोष्ट रसिकाला विश्वासांत घेऊन सांगत राहतात व तोहि भुलून जाऊन गोष्ट ऐकत राहतो. 'शाळातपासणी' गोष्टींत आडवाटेच्या खेड्यांतील शाळा तपासायला गेलेल्या एका ए.

---

जांभळाचे दिवस—[ कथासंग्रह : श्री. व्यंकटेश माडगूळकर; प्रकाशक : कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें. किंमत तीन रुपये. ]

ओ. ची फटफजिती वर्णन केली आहे. अर्थात् ही गोष्ट हास्योत्पादक वर्णनाने व प्रसंगांनी भरलेली असली तरी ती वाचून झाल्यावर, खेडयांतील शिक्षणाचें तें उदास चित्र पाहून एक प्रकारची गूढ विषण्णताच मनांत भरून राहील. 'जांभळाचे दिवस' या कथेंतील चमनचें व्यक्तिचित्रण चांगलें आहे, पण या कथेचा शेवट मात्र समाधानकारक वाटत नाही. एक प्रकारच्या अगतिकतेंतच कथा संपल्यासारखी वाटते.

ग्रामीण जीवनाबरोबरच नागर जीवनाचेंहि दर्शन माडगूळकरांनी येथील कांही कथांत घडविलें आहे. 'सायकल', 'पंचाण्णव पौंडांची मुलगी', 'बाई', 'उतारावर' इ. कथांमध्ये विशेषेंकरून मध्यमवर्गीय जीवनांतले कांही क्षण टिपलेले आहेत. या कथांत मानवी मनाचे कंगोरे चांगले चित्रिलेले असले तरी त्या त्या कथावस्तूचा घाट मात्र वरील कथांइतका ठीकठीक जमला नाही असें वाटतें. 'सायकल' व 'पंचाण्णव पौंडांची मुलगी' मधील प्रसंगांची आकस्मिकता व 'उतारावर' मधील घटनांमागील हेतुपूर्वकता थोडी फार बोचतेच.

या संग्रहांतील 'अनवाणी' व 'सकाळची पाहुणी' या दोन कथा चिरस्मरणीय आहेत. पहिल्या कथेंत ओथंबून राहिलेली निखळ मानवता व दुसऱ्या कथेंतील स्वप्नधूसर, आर्त वातावरण मनाला चटका लावून सोडतें. तापलेल्या जमिनीवरून अनवाणी फिरणाऱ्या गरीब पोस्टमनला वहाणा बनवून आणून देण्यासाठी चाललेली एका कोमल मनाची फडफड आपण 'अनवाणी'मध्ये प्रत्यक्ष ऐकूं शकतों. अपंग बेबीची आपणाविषयीची सहानुभूति पाहून पोस्टमनचेंहि मन विरघळून जातें. तें प्रतिसाद देऊं लागतें. म्हणतें—"या लेकरानं मला अनवाण्याला वहाणा दिल्या. त्याला पाय नाहींत ते कसे देणार मी ?" या प्रतिसादामुळे मूळचा करुणेचा हुंकार अधिकच प्रभावी ठरतो व सारीच कथा मनावर खोल संस्कार करून जाते. 'सकाळची पाहुणी'मधील आरंभीचें—मोकळ्या सोडलेल्या वासरासारखें हुंदडणारें, जीवनाशीं मस्तीने झटणारें नायकाचें मन, अवचित अवतरलेल्या जुन्या मैत्रिणीच्या सत्याभासाने एकदम निराळ्याच विश्वांत संचरूं लागतें. स्मृतीच्या धुक्यांत तें बुडून जातें; आणि 'गुणवती'च्या गुणांचें, प्रेमाचें, सहवासाचें विश्व त्याच्यापुढे साकार होतें. सत्य आणि सत्याभास यांच्या सीमारेषा पुसून जातात! 'नव्हत्याचें होतें' झालेंच आहे असें वाटतें. असें कांही घडतेंहि! कथारूपांत अवतरलेलें हें एक भावकाव्यच आहे म्हणावें. ● ● ●

वि. म. कुलकर्णी

# पत्रव्यवहार

## मराठींतील देशी शब्द : कांही विचार

प्रा. वा. दा. गोखले यांनी म. सा. पत्रिकेच्या गेल्या अंकांत मराठींतील देशी शब्दांविषयी चर्चा केली आहे. त्यांतील कांही मुद्द्यांचें स्पष्टीकरण होणें आवश्यक आहे, असें वाटतें.

'देशी शब्द' या संज्ञेचा अर्थ व व्याप्ति प्रथम निश्चित करणें आवश्यक आहे. 'खरे देशी शब्द ते की जे द्राविडादि भाषांतून, त्याचप्रमाणे भारतांतील मूळचे रहिवासी-कोल, गोंड, संताळ, नाग, कातकरी—इत्यादिकांच्या बोलींतून सामाजिक संपर्कामुळे वैदिक भाषा, संस्कृत भाषा, प्राकृत भाषा, अपभ्रंश भाषा या सर्वांत आले व त्या त्या भाषांशीं एकरूप बनले' असें देशी शब्दांचें व्यवच्छेदक लक्षण प्रा. गोखले यांनी दिलें आहे[1], तें योग्य वाटतें. तेव्हा, या व्याख्येच्या आधारेंच मूळ संस्कृत शब्दांना किंवा त्यांच्या तद्भव रूपांना मात्र 'देशी शब्द' म्हणून संबोधितां येणार नाही, हें उघड आहे.

"जुन्या व्याकरणकारांनी 'देशी' या सदरांत सर्व अनुकरणवाचक शब्दांचा व सर्व अव्युत्पत्तिमत् शब्दांचा समावेश" केला असल्यास तो जशाच्या तसा स्वीकारणें उचित नाही, असें वाटतें. अर्थात्, हे शब्द देशीच आहेत किंवा नाहीत, हें ठरविणें कठीण असल्यामुळेच या शब्दांचा उल्लेख 'अनुकरणवाचक' किंवा 'ध्वन्यनुकारी' आदि संज्ञांनी केल्यास अधिक सोयीचें होईल.

देशी शब्दांत बरेच तद्भव शब्द घुसडले गेले असल्यासंबंधींहि प्रा. गोखले यांनी विवेचन केलें आहे. यासंबंधींहि योग्य ती दक्षता घेतली पाहिजे, नाही तर संस्कृत भाषेंतील कांही तद्भव शब्दांवर अन्याय केल्यासारखें होईल. वैदिक भाषेंत व संस्कृतांत न आढळणाऱ्या मूळच्या देशी शब्दांनाच 'देशी' म्हणतां येतील. या बाबतींत प्रा. गोखले यांनी दिलेली एक सूचना लक्षांत घेण्याजोगी आहे. कांही देशी शब्द आर्य व आर्येतर यांच्या निल्याच्या संपर्कानें आर्य-भाषेंत आले आहेत. त्यामुळे मूळचे संस्कृत शब्द व त्यांत मिसळलेले देशी शब्द यांत तफावत करणें कठीण झालें आहे. नियमाप्रमाणे ज्या शब्दांच्या (संस्कृतांतून प्राकृतांत येतांना होणाऱ्या) भाषाशास्त्रीय प्रक्रिया आढळतात, त्यांचा प्रश्न येथे उद्भवत नाही; पण ज्या शब्दांचें मूळ संस्कृतांत सापडतें व ज्या शब्दांचा धनपाल आणि हेमचंद्र यांनी आपल्या कोशांत उल्लेख केलेला नाही, अशा शब्दांना केवळ 'संस्कृतांतून प्राकृतांत येतांना जे नियम आहेत, त्यांत ते बसत नाहीत' म्हणून देशी शब्दांच्या सदरांत टाकणेंहि योग्य होईल, असें वाटत नाही.

संबंधवाचक शब्दांच्या बाबतींत स्वतंत्र विचार करणें आवश्यक आहे. 'सर्व देशांतील संबंधवाचक शब्दांचा अभ्यास केल्यास त्यांत विलक्षण साम्य आढळेल,' असें डॉ. म. अ. करंदीकर यांनी आपल्या प्रबंधांत म्हटलेंच आहे.[2] तेव्हां त्यांचें मूळ कोणतें मानावें व कोणत्या भाषेचा शिक्कामोर्तब त्यांच्यावर करावा हा प्रश्नच आहे. फार्सींतील आणि मराठींतील नात्यांचे बरेच शब्द जुळतात; पण त्यावरून मराठीने ते शब्द फार्सीपासून घेतले असें म्हणतां येत नाही; कारण संबंधवाचक शब्द ही मानवाची प्राथमिक व निकडीची गरज होती. जे मानव-वंश एका मध्यवर्ती ठिकाणाहून आसपासच्या प्रदेशांत पसरत गेले त्यांनी

१. मराठी शब्दसंग्रह-मीमांसा, टंकलिखित प्रत, पृ. १८९.

२. म. सा. पत्रिका, अंक १२३, पृ.३१.

आपले नात्याचे शब्दहि आपल्याबरोबर नेले. त्या शब्दांची तत्सम वा तद्भव रूपें त्या विशिष्ट प्रदेशांतील भाषा-वंशांत पुढे प्रचलित झाल्याचें दिसतें. नाना, बाप, बापू, भाऊ, मामा या प्रा. गोखले यांनी आपल्या लेखाच्या शेवटीं दिलेल्या यादींतील शब्दांविषयीहि असेंच म्हणतां येईल. इंडोयुरोपियन कुळांतील अन्य भाषांतहि या शब्दांना सदृश असे इतर शब्द आढळतात. त्याचप्रमाणे ( अवेस्ता > ) फार्सी व ( लॅटिन > ) इंग्रजी इ० भाषांतील व भारतीय भाषांतील संबंधवाचक शब्द किती जुळतात, यासंबंधीं आजवर बरेंच विवेचन झालें आहे. डॉ. करंदीकर यांनीहि याविषयी कांही दाखले सोदाहरण दिले आहेत.[३]

याशिवाय, हेमचंद्राने कांही अरबी-फार्सी शब्दांचा समावेश देशी शब्दांच्या सदरांत केला आहे, तें गैर नाहीं असें प्रा. गोखले यांनीं म्हटलें आहे. हेमचंद्राने जरी उल्लेख केला असला तरी आधुनिक भाषाशास्त्रज्ञाने तेंच ' योग्य ' मानून चालणार नाहीं. फार्सी व अरबी शब्द उघड उघड परकीय असतांना त्यांना ' देशी ' म्हणून संबोधणें तर्कशुद्ध वाटत नाहीं. प्रा. गोखले यांनी आपल्या लेखाच्या शेवटीं दिलेल्या यादींतील ' दस्तरुमाल ' हा शब्द फार्सीतून आल्याचा उल्लेख केला आहे. मात्र, दस्तहातरुमाल हा त्यांनी पृ. ३२ वर दिलेला अर्थ योग्य नाहीं. ' दस्त ' या शब्दाचा फार्सीतील अर्थ केवळ ' हात ' असाच आहे. स्टेनगॅसनेहि हाच अर्थ दिला आहे.[४] पृ. ३३ वरील 'उचलेगिरी' या शब्दांतील 'गिरी' हा फार्सी प्रत्यय होय. ' पेहरण, पेरण ' या शब्दांच्या मुळासंबंधी विचार करीत असतांना सं. परिधान या शब्दाबरोबरच फा. पेरहन् या शब्दाचाहि विचार करावयास हवा. पृ. ४० वरील ' मतवाल ' या शब्दाबरोबर दिलेल्या ' मस्तवाल ' या शब्दाचा फार्सी ' मस्त ' या शब्दाशीं विश्वासार्ह असा संबंध आहे. ' कमावणें ' हें क्रियापद मराठी वळणाचें दिसत असलें तरी त्यांतील मूळ धातु फार्सी असावा, असा विचार श्री. ग. ह. खरे यांनी ' ज्ञानप्रकाशां 'त केलेल्या शब्द-चर्चेत व्यक्त केला आहे,[५] तोहि येथे जमेस धरला पाहिजे.

हेमचंद्राने काटेकोर रीतीने देशी शब्दांची निवड केलेली नाहीं, हें प्रा. गोखले यांचें मत लक्षांत घेऊन आज या सर्व देशी शब्दांसंबंधी पुनर्विचार होणें जरूर आहे. प्रा गोखले यांनी म. सा. पत्रिकेतील लेखांत देशी शब्दांसंबंधी विवेचन करून चर्चेस प्रारंभ केलेलाच आहे. त्याप्रमाणे आधुनिक भाषाशास्त्राच्या इतर अभ्यासकांनी ' देशी शब्द ' या संज्ञेची व्याप्ति व आज ' देशी शब्द ' या नांवाने प्रचलित असलेल्या शब्दांचें पुन्हा एकदा परीक्षण करणें आवश्यक आहे.

आपला

प्रा. यू. एम्. पठाण,

एम्.ए., बी.टी.

३. सदर पृ. १८१ ते १८४.

(4) A Comprehensive Persian-English Dictionary, P. 519.

५. ज्ञानप्रकाश, १९ सप्टेंबर १९३५.

